# हरि केशवजी यांचें चरित्र.

## रामचंद्र हरि

ह्यांनीं लिहिलें.

तें





मुंबईंत

निर्णयसागर छापखान्यांत छापिलें.

सन १९११.

किंमत २ रुपये

# प्रस्तावना.

माझ्या परम पूज्य तीर्थरूपांचें चरित्र प्रसिद्ध करावें ह्मणून माझे परम स्नेही कै० प्रोफेसर राजाराम शास्त्री भागवत यांनीं प्रथम मला सुचविलें. परंतु, कार्यव्यापृत्वामुळें ते असतां चरित्र तयार झालें नाहीं. गतवर्षीं माझे मित्र श्रीयुत काशीनाथ रघुनाथ मित्र यांचेकडूनहि चरित्रासंबंधीं मला सूचना झाली. त्यावरून मीं हा अल्प प्रयत्न केला आहे. माझें मराठी व इंग्रजी प्राथमिक शिक्षण बहुधा तीर्थरूपांचे देखदेखीखालीं झाल्यानें त्यांनीं केलेल्या ग्रंथांची माहिती त्यांनींच मला करून दिली होती. त्यांचे निधनानंतर त्यांचे स्नेही, आप्त व मुख्यत्वेंकरून त्यांचे चुलते माधव गोपाळ यांनीं प्रसंगानुसार त्यांचें पूर्ववृत्त इत्यादि गोष्टी सांगाव्या, त्यांवरून पूर्ववृत्त लिहिलें आहे. गुरुसांप्रदायिक परंपरा माझे गुरु रामभाऊ केसकर महाराज यांकडून मला कळली. तीहि ह्या चरित्रांत प्रसंगोपात्त ग्रथित केली आहे. जीवनवृत्तसंबंधीं माहिती त्यांस मिळा-लेल्या शिफारपत्रांवरून मला मिळाली, व आनरेबल जेम्म फेरीश साहेब, ते वेळींचे मुंबईचे लेजिस्लेटीव कौन्सीलर, व कांहीं मुदतपर्यंत मुंबईचे आक्टिंग गवरनर होते, त्यांचीं कांहीं पत्रें तीर्थरूपांस लिहिलेलीं संग्रहीं होतीं, त्यांवरून

त्याची तीर्थरूपांवर अति कृपा व लोभ होता हें समजलें. भाषांतररूपानें त्यांनीं प्रसिद्ध केलेल्या ग्रंथांसंबंधी ही माहिती एज्युकेशन सोसायटी वगैरे संस्थांचे ते वेळींच्या संग्रहीं असलेल्या रिपोर्टांवरून मिळाली, ती या चरित्रांत दिली आहे. त्यांनीं केलेले ग्रंथ प्रस्तुत बहुधा उपलब्ध नसल्यामुळें त्यांतून कांहीं कवितांचे वेंचे इत्यादिक विषय दिग्दर्शनार्थ देणें इष्ट वाटल्यावरून या चरित्रांत दिले आहेत. तसेंच धार्मिक मतांसंबंधीं त्यांचे हस्तलेख संग्रहीं आहेत, त्यांतून कांहीं लेखहि चरित्रासोबत दिले आहेत. ह्या माझ्या अल्पप्रयत्नांत माझे मित्र रावसाहेब विनायक कोंडदेव ओक यांनीं मला साह्य करून हें चरित्र प्रसिद्धिपूर्वीं शोधून दिलें, व ह्यास उपोद्घात जोडिला, याबद्दल मी त्यांचा फार फार आभारी आहें.

मुंबई; गिरगांव मार्गशीर्ष व० ११ शके १८३३; ता. १६ दिसेंबर सन १९११. प्रकाशक.

# उपोद्घात.

"समानशीले व्यसनेषु सख्यं" असें म्हटलें आहे. त्याची आकस्मिक प्रतीति स्वभावतःच अत्यंत आनंदकारक असते. ह्याचा अनुभव मला हरि केशवजींच्या चरित्राच्या परिचयानें आला. ह्याबद्दल आधीं प्रथम मला, त्यांचे चिरंजीव राजमान्य राजश्री रामचंद्र हरि ह्यांचे फार फार उपकार मानिले पाहिजेत. कां कीं, हा अलभ्य लाभ मला त्यांच्या योगानें झाला आहे. बाकी, वास्तविक पाहिलें असतां, हें सगळें चरित्र रा. रा. रामचंद्र हरि ह्यांनीं लिहिलें आहे. त्यांत पूज्यबुद्धि ओतप्रोत आहे. आणि तिचा प्रवाह इतक्या जोराचा आहे कीं, त्यांत हात घालण्यास कोठेंच सवड दिसली नाहीं. त्यांत मीं जें काय केलें, तें एवढेंच कीं, विषयांच्या धोरणानें वेगळे वेगळे भाग पाडिले, आणि चरित्र छापत असतां त्याचे कच्चे खरडे वाचून पाहिले. ह्याशिवाय मीं दुसरें कांहींएक केलें नाहीं: तरी, मी चिपळूणच्या मराठी शाळेंत पुरुषोत्तमपंत काणे ह्यांच्या हाताखालीं इ० स० १८५५-५६ सालीं अभ्यास करीत असतां, **नीतिग्रंथ** आणि **पदार्थविज्ञानशास्त्र** ह्या त्यांच्या ग्रंथांचें पठण केलें, तें माझ्या वाचनाभिरुचीस फार पोषक झालें, आणि त्याच्या योगानें मला शिकण्याची आवड उत्पन्न झाली, ही देणगी फार मोठी आहे. ह्या पुस्तकांचा अभ्यास मी करीत होतों, तेव्हां हरि केशवजी हे त्यांचे रचिते, कोणी तरी मोठे विद्वान् असले पाहिजेत, असें माझ्या मनाला वाटत असे. ह्याच्या पलीकडे मला त्यांची कांहींएक माहिती नव्हती. तरी, ह्यांच्यासारखे ग्रंथ आपणास करतां यावे, असेंही केव्हां केव्हां मला वाटे. पण, तें जागचेजागीं जिरे. कां कीं, तसे योग येण्याचीं चिह्नें तेव्हां मुळींच कांहीं दिसत नव्हतीं. परंतु, ईश्वरी सूत्र कांहीं वेगळें असतें. तें अगदीं अतर्क्य असतें. त्याप्रमाणें गोष्टी घडून येऊन, ज्या मार्गानें हरि केशवजी गेले, त्या मार्गानें देवानें थोडेंसें तरी मला नेलें, असें ह्या चरित्रावरून मला

दिसून येऊन अत्यंत आल्हाद झाला, त्याबदल मी जगदीश्वराचे फार फार उपकार मानितों.

आतां मूळ चरित्राविषयींचें माझें म्हणणें सांगतों. वडिलांचें चरित्र स्वतः लिहिणें, हें सुदैव फार थोड्यांच्या वांट्यास येतें. कां कीं त्यास, चरित्र लिहिण्यासारखे तीर्थरूप असणें हें एक, आणि अशा तीर्थरूपांच्या गुणानुवादानें आपली वाणी किंवा लेखणी पावन करण्याविषयीं इच्छा होणें हें दुसरें, हीं दोन साहित्यें अत्यंत अवश्यक असतात. ह्या दोहोंची गांठ अगदीं क्वचित् पडते. आज पंचेचाळीस वर्षें लिहिण्याचा व्यवसाय मी थोडाबहुत करीत आहें, त्यामध्यें असे सुपुत्र मला श्रीमंत राजमान्य राजश्री तुकाराम जावजी शेटसाहेब, जे. पी., श्रीमंत राजमान्य राजश्री रावराजे रघुनाथराव दिनकरराव राजवाडे, राजमान्य राजश्री मोरेश्वर हरिश्चंद्र जोशी, आणि हे रा. रा. रामचंद्र हरि एवढेच कायते आढळले. ह्यांचें आम्ही मनःपूर्वक अभिनंदन करितों.

परिस्थितीचा विचार करून पाहिला म्हणजे असें दिसतें कीं, हें चरित्र फार चांगलें उतरलें आहे. चित्रकलाप्रवीणांचें असें एक मत आहे कीं, चितार्‍यानें स्वहस्तें कोणाचेंही चित्र काढिलें असतां, त्यांत त्याच्या स्वतःच्या आंगलटीचें थोडेंना थोडें तरी वळण कोठेंना कोठें तरी दिसून येतें. आणखी प्रकृत विषय त्यापेक्षां एक पायरी, कां शंभर पायर्‍या पुढें आहे. तें असें कीं, तद्विषयक अभ्यास नसतां, केवळ अनुवंशिक गुणधर्माच्या प्रसादबलानें हें चरित्र उतरलें आहे. हें ह्या पितृभक्त प्रकाशकांस अत्यंत भूषणावह आहे.

हरि केशवजी ह्यांचीं धर्ममतें तेव्हांच्या परिस्थितीच्या मानानें कसकशीं फिरत गेलीं, आणि शेवटीं त्यांच्या मूळधर्ममतांचें प्राबल्य कायम राहिलें त्यास घरच्या वडील माणसांचें आणि तेव्हांच्या शिष्टांच्या आचरणांचें धोरण कसें उपयोगीं पडलें, इत्यादि गोष्टीचें विवेचन ह्या चरित्रांत केलें आहे. तें सध्यांच्या तरुण वाचकांस फार उपयोगीं पडेल असें मला वाटतें.

त्यांत दुसरी एक गोष्ट विशेष लक्षांत ठेवण्यासारखी ही आहे कीं, हरि केशवजींचा मराठी ग्रंथ लिहिण्याचा काळ म्हणजे पन्नास पंचावन वर्षांच्या मागचा—एकुणिसाव्या शतकाचा मध्य–होता. तेव्हां इकडे इंग्रजी होऊन अवघीं वीस पंचवीस वर्षें झालीं होतीं. आणखी तेव्हांची मुंबईची वस्ती म्हणजे अठरापगड जातींची. तेथची भाषा तशीच धेड-गुजरी. आणखी शुद्ध मराठी भाषेचें माहेर पुणें त्यामध्यें आणि मुंबई-मध्यें दळण वळण फारसें नव्हतें. शिवाय त्यांतही मराठी ग्रंथांची छान्नी करण्यास तेव्हां सरकारानें क्यांडी साहेबांसारखे वेगळे अधिकारी नेमले नव्हते–अगदीं कोंवळी इंग्रजी होती–तरी, हरि केशवजीचें भाषांतर पाहून असें वाटतें कीं, त्यांनीं स्वप्रयत्नानें आणि अभ्यासानें ह्या सगळ्या अडचणी उत्तम प्रकारें जिंकिल्या होत्या, आणि त्यांतून चांगला मार्ग काढिला होता. ह्याचीं पुष्कळ उदाहरणें देण्यास येथें अवकाश नाहीं. तरी, केवळ मासल्याकरितां एक देतों.

'Great men, who are admired and praised by everybody, are often found to be more modest than persons of ordinary ability. Sir Isaac Newton, the eminent philosopher, was one of those great and at the same time modest men.'

ह्याचें मराठी भाषांतरः–"जे महान् विद्वान् व बुद्धिमान् ज्यांचें सर्व लोक आश्चर्य आणि ज्यांची स्तुति करितात असे जे पुरुष ते अल्पगुणी मनुष्यापेक्षां बहुधा विशेष संकुचित आढळतात. असे थोर असून अत्यंत संकुचित जे पुरुष त्यांतलाच सर ऐझाक् न्यूटन हा प्रसिद्ध तत्व-ज्ञानी होऊन गेला".

नीतिग्रंथ–इ० स० १८४६.

भाषांतर–बरोबर तंतोतंत भाषांतर–ह्या दृष्टीनें पाहिलें असतां, हें किती बरोबर आहे, हें मार्मिक शिक्षकांस आणि आस्थेवाईक विद्या-र्थ्यांस सहज कळेल. अगदीं इंग्रजी पद्धति धरिली आहे, ही ह्यांतल्या वाक्यरचनेची गोष्ट एकीकडे असो. पण Modest–ह्याचें भाषांतर

**संकुचित** ह्या शब्दानें केलें आहे. हें केवळ ह्यांच्या स्वतःच्या युक्तीचें आहे; कां कीं, इंग्रजीचें मराठी करण्यास मोठा मुख्य आधार काय तो मेझर क्यांडी ह्यांची इंग्लिश मराठी डिक्शनरी, तिची पहिली आवृत्ति सदरहू ग्रंथाच्या मागून एका वर्षानें–इ० स० १८४७ त- बाहेर पडली. आणि तींत ह्या शब्दाचे अर्थ निगर्व, निगर्वी, निर- भिमान, निरभिमानी, निरहंकारी, अमानी, असे कितीएक दि- आहेत; पण त्यांत **संकुचित** शब्द नाहीं. ह्याचें कारण आम्हांला असें वाटतें कीं, मेझर क्यांडी ह्यांची शब्दार्थाविषयीं जिकीर फा- असे. त्यांत ते प्रचाराला फारसा मान देत नसत. व्याकरणाव- त्यांची दृष्टि फार असे. पण आम्हांला वाटतें संकुचित हाच शब्द विशेष योग्य आहे.

शाळाखात्यांत आलीकडे ग्रंथ तयार झाले आहेत ते, शिक्षण- खात्याचे मराठी ट्रान्सलेटर आणि त्यांची पंडितमंडळी ह्यांच्या वादविवादांच्या मुशींतून निघालेले आहेत. तेव्हां त्यांत इंग्लिश वाक्यरचनेची छाया अगदीं कमी आहे, ह्यांत कांहीं आश्चर्य नाहीं. परंतु, तसें कांहीं साह्य नसतां, इंग्रजीचें मराठी इतकें तंतोतत हरि केशवजी ह्यांस करतां येत होतें, हें त्यांच्या भाषाभिज्ञतेस मोठें भू- षण होय.

शिवाय, ह्या चरित्रामध्यें जो एक विशेष प्रकार दिसून येतो, तो हा कीं, ख्रिस्ती धर्मोपदेशकांच्या सहवासानें आणि उपदेशानें त्यांची श्रद्धा हिंदुधर्मावरून उडत चालली असतां, "शामराजतात्यांनीं धर्मसंबंधीं त्यांचे शंकांचें सप्रमाण समाधान करून त्यांचा धर्मविरुद्ध असलेला भ्रम दूर केला व ते त्यांचे शिष्य बनले." एवढेंच केवळ नव्हे, तर, ते अगदीं पक्के हिंदुधर्मकर्मठ झाले. हें त्यांच्या धर्मसंबंधीं लेखांवरून कोणालाही कळण्यासारखें आहे. पण, हा एक मोठा चमत्कार आहे. महाराष्ट्रापैकीं नामांकित ख्रिस्ती झालेल्या लोकांमध्यें रे. रामकृष्णपंत मोडक, रे. विष्णुपंत करमरकर, रे. बाबा पदमनजी, व रा. शाहूराव कुकडे हे

प्रमुख होते. त्यांचीं चरित्रें पाहिलीं म्हणजे असें कबूल करावें लागतें कीं, खिस्ती धर्माच्या मिठीपासून हरि केशवजींस शामराजपंत तात्यांनीं अजीबात सोडविलें, हा खरोखर मोठा पराक्रम होता. कां कीं, ती मिठी सोडविण्याविषयींचे पुष्कळ मोठमोठ्यांचे प्रयत्न व्यर्थ गेले आहेत, हें पुष्कळांस पक्कें ठाऊक आहे. ह्यांत शामराजपंततात्यांस धन्यवाद दिला पाहिजे.

बाकी, धर्मविचारांचें मूळ वळण हरि केशवजींस त्यांच्या खिस्ती मित्रांच्या सहवासानें लागलें असावें, असें उघड दिसतें. कां कीं, तशी जागृति त्या वेळच्या इतर इंग्लिश शिकलेल्या विद्यार्थ्यांत कोठें आढळत नाहीं. रावसाहेब मंडलिकांच्या लेखांत कोठें नाहीं; आणखी, दुसरें असें कीं, ह्यांनीं जे धर्मविषयक लेख लिहिले आहेत, ते एके प्रकारीं अपूर्व आहेत. ते लेख, कांहीं अंशीं, भाषेच्या सरणीनें, खिस्तीधर्मी उपदेशकांच्या लेखांसारखे दिसतात. ते फार चांगले, धर्मश्रद्धापरिपूर्ण आहेत, ते हरि केशवजींच्या धर्मश्रद्धेच्या व्याप्तीची उत्तम साक्ष पटवितात.

हरि केशवजींच्या गद्यापेक्षां पद्यांचा आम्हांस फार चमत्कार वाटतो. त्यांच्या लहानपणांत छापखाने फारसे नव्हते. आणि मराठी कवितांचा प्रचार तर अगदींच थोडा होता. अभंग, श्लोक आर्या ह्यांची ओळख साधारण लोकांत प्रथम नवनीतावरून झाली. तें ह्यांस लहानपणीं वाचायास सांपडलें असेल कीं नसेल, ह्याची शंकाच आहे. असें असतां, त्यांनीं यात्रिक क्रमणाच्या भाषांतरांत इंग्रजी पद्यांचें मराठी पद्यांत जें भाषांतर केलें आहे, तें पुष्कळ अंशीं वामनपंडितांच्या कवितांच्या श्लोकांच्या बरोबरीचें दिसतें. भाषांतर असें वाटतच नाहीं. पहाः—

**आश्चर्य हें थोर दिसेच लोकीं**
**मातें कसें रक्षियलें विलोकीं**
**त्या घोर विघ्नांतुनियां मला हो**
**नेलें दुरी हाचि अतुल्य लाहो.** १.

**या खोऱ्यांत मला पिशाच नरकें पापें तमें वेष्टिलें**
**गर्तापाशहि जाळ दुःखद मला यांनीं पथीं कष्टिलें**
**तेव्हां जो स्वकरें सुरक्षित करी तो धन्य वाटे मला**
**कीर्तीचा शिरिं ज्याचिया मुकुट त्या मी वर्णितों निर्मला. २**

**इशूनें मला रक्षिलें पामराला**
**तयाच्या कृपें शोक सारा विराला**
**तयावीण मी गुंततों पाशबंधें**
**म्हणूनी तया गातसें मी प्रबंधें. ३.**

हें इंग्रजीचें भाषांतर आहे, असें कोण म्हणेल? आणखी, हे जरी पक्के हिंदु होते, तरी ह्यांच्या ह्या शब्दांत जें स्तुतिस्तोत्र येशू ख्रिस्ताचें आलें आहे, हें मराठींतले ख्रिस्ती महाराष्ट्र कवि रा. सांगळे, आणि रे. टिळक ह्यांच्या पेक्षां पुष्कळ अधिक प्रेमळ आहे. ह्यावरून असें घ्यावयाचें कीं, औषध कोणत्याही जातीच्या वैद्याचें असो, गुण एक असतो, त्याप्रमाणें भगवंताच्या करणीचे गुणानुवाद कोणत्याही धर्माचे साधु गावोत, त्यांत प्रेमळता एकसारखी असावयाची. कां कीं, वर्णनीय वस्तूचे गुणधर्म एक. ह्यांतच "एकमेवद्वितीयं" हें तत्व आहे. आणि हें तत्त्व हरि केशवजींच्या अंतःकरणांत त्यांच्या गुरुजींच्या कृपाप्रसादानें चांगलें बिंबलें होतें, म्हणूनच त्यांचें धर्मांतर टळलें, असें आम्हांस वाटतें. आणि हें केवळ ईश्वरी कृपेचें फल होय.

असो. कोणत्या ना कोणत्या निमित्तानें हरि केशवजींसारख्या सत्पुरुषाचा सत्समागम, चरित्रद्वारें मला लाभला, ही मजवर देवाची मोठी कृपा झाली, असें मी समजतों. आणि हा योग हरि केशवजींच्या चिरंजीवांनीं आपण होऊन मला आणून दिला, म्हणून पुनः एकदा त्यांचे फार फार उपकार मानून येथें ह्या विषयाचा निरोप घेतों.

**मुंबई,**
१२ डिसेंबर १९११.

**विनायक कोंडदेव ओक.**



# अनुक्रमणिका.





# हरि केशवजी यांचें चरित्र.

## भाग पहिला.

### पूर्ववृत्त आणि जन्म.



**सो**मवंशी क्षत्रिय पाठारे ज्ञातींत हरि केशवजी हे एक प्रसिद्ध विद्वान् गृहस्थ होऊन गेले. यांचें जन्म इसवी सन १८०४ सालीं झालें. मुंबई येथें गिरगांवांत ह्यांचे वडिलांची वस्ती फार प्राचीन होती. गिरगांव येथें यांचें ज्ञातींतील जीं प्रमुख घराणीं आहेत, त्या घराण्यांपैकीं यांचें एक प्रमुख घराणें आहे. ज्ञातीविषयसंबंधीं गिरगांव येथील ज्ञातीचे मानकऱ्यांत यांच्या घराण्यांतून परंपरेनें मानकरी झालेले आहेत. यांचें घराण्याचें उपनांव **पुरव** असें आहे. यांचे आजे गोपाळजी सोनजी हे गिरगांव येथें आपल्या शेतीभाती वतनवाडीवर निर्वाह चालवीत असत. ते इतर धंद्यांत गुंतून न राहतां स्नानसंध्यादिक नित्यकर्म व भजनपूजन, यांतच आपला कालक्षेप करीत असत. ते उत्तम वेदांती

होते. पुणें येथील महाराज शामराज केसकर ऊर्फ शामर
तात्या यांचे समागमानें पुढें त्यांनीं गिरगांवांतील आप
ज्ञातींत व इतर मंडळींत भागवतसांप्रदायाचा बराच प्र
केला. ह्या सांप्रदायास **नाथ**सांप्रदाय असें म्हणतात.

सुमारें दीडशें वर्षांपूर्वीं पुणें येथें, श्रीअच्युत महा
केसकर ह्मणून एक महान् सत्पुरुष हो
गेले. त्यांस स्वप्नांत श्रीज्ञानेश्वर मह
जांचा अनुग्रह झाला होता असें ह्मणत

शामराज महाराज केसकर ऊर्फ शामराजतात्या.

शामराजतात्या केसकर हे त्यांचे वंशीय असून त्यांस
अच्युत महाराजांनीं अनुग्रह दिला होता. त्या वेळ
मुंबईतील दक्षिणी हिंदु समाजांत ज्ञानेश्वरीचें विवे
वेदांत आदिकरून आध्यात्मिक विषयांसंबंधानें शामर
तात्या फार प्रसिद्ध होते. ते उत्तम वक्ते असून पहि
प्रतीचे हरिदास होते. पाठारे प्रभु, शेणवी, सोम
क्षत्रियपाठारे इत्यादि ज्ञातींत त्यांची बरीच शिष्यसांप्रदा
मंडळी होती, व अझूनहि आहे. हे सुमारें साठ वर्षां
पुणें येथें समाधिस्थ झाले. मागाहून त्यांचे चिरंजीव
पुणें येथें सदाशिवपेठेंत सांप्रदायिक मंडळीच्या सा
श्रीरुक्मिणीपांडुरंगाचें देवालय बांधून त्यांत त्यांची सम
बांधिली आहे. यांनीं पदें, अभंग वगैरे बरीच कवि
केली, परंतु ती आतां उपलब्ध नाहीं. कवितेपैकीं सं
असलेलीं एकदोन पदें खालीं देत आहें त्यांवरून त्य

वेदांतपारंगतता, साधुवृत्ति व श्रीज्ञानेश्वर महाराजांचे ठिकाणी **निस्सीम** भक्ति दिसून येते.

पद १.—देव देवतांतर बगा कशाला देव देवतांतर बगा ॥
आत्मपणें सुखरूप नांदतां मग तुज नाहीं दगा कशाला॥देव०ध्रु०॥
सर्वेंद्रियद्वारें कीं भजतो जो श्रीहरिचा भगा ।
आकाशविहरणीं किमपी जैसा श्रम नाहीं त्या खगा ॥
भेदीं अभेददर्शन पायां जे रिति वर्णन गा ।
त्याचे जवळीं धांऊन येती चारी मुक्ति लगबगा ॥कशाला० १॥
स्वात्मचा स्वाद चाखिल्या घरीं बसल्या मघमघा ।
स्वानुभूतिसुखबोध बोधला बोले ना मग उगा ॥
ऋद्धिसिद्धि त्याचे जवळीं येउनि करिति निगा ।
त्याच्या दर्शनस्पर्शनस्मरणें दोष जळती धगधगा ॥कशाला० २॥
पूर्ण भोगरस पाणीन गणीच योगादिक दुर्भगा ।
श्रीगुरुपादप्रसादें चढल्या कैवल्याच्या शिगा ॥
कर्मीं निष्कर्मांचा, ल्याला सर्वांगीं तो झगा ।
शामराज श्रीज्ञानेशाचे चरणीं लसत झगमगा ॥ कशाला० ३ ॥

पद २.—येरे येरे माझ्या ज्ञानोबा ॥ ज्ञानोबा ॥ ध्रु० ॥
सदा सेव्यपणीं प्रीय सज्जनाशीं, रे ।
सिद्धी आणि माया सर्व दासि रे ॥
ब्रह्ममूर्ती सच्चिदानंद राशिरे ।
स्वदन सदय श्रमित अभय विगलित भय ॥ येरे० १ ॥
ब्रह्मविद्येचें सुख जगा केलें रे ।
चिद्विलासी हें विश्व भरियेलें रे, ॥
मायामय वर्जूनी भय सर्वाद्वय ।
सेवुनि ज्ञानवृंद पूर्ण सुखी झाले रे, ॥ येरे० २ ॥

ज्ञानदेव नाम नित्य मुखीं गातो रे, ।
त्याशीं ज्ञान देऊनि मोक्षपदा नेतो रे, ॥
शामराजपदसरोज हृदयीं ध्यातो रे, ।
करित नमन नुरवुनि मन, येर चुकवि निधन ॥येरे०

पद ३.—कसा गुरु विलसतो नानाकारें ॥ कसा० ध्रु० ॥
कनककुंडल हे हेमपर्णेची गुरू विस्तारें ॥ कसा० १
पूर्णपर्णे पूर्णाशीं तारी, शेवटीं पूर्णची सारें, ॥कसा०
शामराजही गुरुपणें नांदे, सच्चिद सुखमय बा रे॥कसा०

पद ४.—हें निरुपाधि स्वरूप हरिचें ।
आत्मलक्ष सकळांही जीवांचें ॥ हें० ध्रु० ॥
ज्ञेय ज्ञान ज्ञाताही नाहीं,
प्रतीत भयलय स्थान मनाचें ॥ हें० १ ॥
अजर अमर मन बुद्धि अगोचर,
जाणीव निरसुनी केवळ साचें, ॥ हें० २ ॥
शामराजही श्रीगुरुपणें नांदे,
उन्मतवत् स्वानंदें नाचे ॥ हें० ३ ॥

परलोकवासी सुप्रसिद्ध हरिदास विनायकबोवा सातार
व त्या वेळचे कित्येक जुने हरिदास हीं पदें कीर्तन
बहुधा ह्मणत असत.

रामचंद्र शामराज केसकर ऊर्फ रामभाऊ केसकर.

शामराजतात्यांचे पश्चात् त्यांचे ज्येष्ठ चिरंजीव राम
शामराज ( रामभाऊ केसकर ) हेही व
लांप्रमाणें ज्ञानेश्वरीविवेचन, वेदांता
आध्यात्मिक विषयासंबंधीं पुणें व मुं

येथें सुप्रसिद्ध होते. ते पहिल्या प्रतीचे हरिदास होते. वक्तृत्व, विषयाची मांडणी व श्रोत्यांचे मनावर सांगितलेल्या गोष्टीचा ठसा उमटविणें, इत्यादि गुण त्यांच्यांत अप्रतिम होते. उत्तम हरिदास ह्मणून त्यांस दक्षिणाकमिटीकडून वार्षिक दक्षणा मिळत असे.

गोपाळजी यांस काळपुरुष पाहणें इत्यादिक विषय अवगत असल्यामुळें त्यांस ८५ वें वर्ष लागतांच श्रावण महिन्यांत देहावसानापूर्वीं सात आठ दिवस आधींच त्यांनीं घरांतील मंडळीस आपल्या निधनाचा दिवस व वेळा सांगून ठेविली. त्या समयीं त्यांस थोडा अतिसाराचा विकार झाला होता. त्यांनीं सांगितल्याप्रमाणें श्रावण वद्य ८ स प्रातःकाळीं स्नानसंध्यादिक आटपून आसनारूढ होऊन घरच्या मंडळींस जवळ बसवून सर्वांस श्रीचें भजन करण्यास लाविलें, व भजन चालू असतां इसवी सन १८२२ सालीं त्यांनीं देह ठेविला. त्यांस तीन अपत्यें होतीं, दोन मुलगे व एक मुलगी. ज्येष्ठ चिरंजीवाचें नांव केशवजी व धाकट्याचें नांव माधवजी होतें.

केशवजी गोपाळजी.

केशवजी हे आपल्या वडिलांप्रमाणें घरीं स्वस्थ न बसतां घरें बांधण्याचें काम करूं लागले. शिल्पशास्त्रांत ते प्रवीण होते. शिल्पशास्त्राचे कांहीं ग्रंथ अझून त्यांचे येथें संग्रहीं आहेत. पालवाचे रस्त्यावरील शेणव्यांचें ठाकुरद्वार त्यांनीं बांधिलें आहे.

तशींच गिरगांवांत त्यांनीं बांधलेलीं कांहीं घरें आ
ते फार कर्मनिष्ठ होते. त्यांचा स्वभाव फार शांत असे.
सन १८५४ सालीं ८७ वर्षांचे होऊन वारले. त्यांचे

माधव गोपाळजी.

माधवजी गोपाळजी कांहीं वर्षें मुंबई कौरि
प्रेसमध्यें मुख्य कंपाझिटर होते. मागा
वार्धक्यामुळें तें काम सोडून घरींच ग्रंथलेखनाचें
करित असत. ते १८७२ सालीं आपल्या वयाच्या ७
वर्षीं वारले.





# भाग दुसरा.

## प्राथमिक शिक्षण आणि उद्योग.



गोपाळजी यांचे वेळीं मुंबईत विद्याभ्यासाचीं साधनें नसल्यामुळें हरि केशवजी यांस प्राथमिक मराठी शिक्षण बहुधा त्यांचे आजे गोपाळजी व मामा त्रिंबकजी ह्यांकडूनच घरीं मिळालें होतें. फावल्या वेळीं मोरोपंतांच्या आर्या, वामनी श्लोक वगैरे नेहमींच्या अभ्यासाशिवाय गोपाळजी, मामा आणि चुलते माधवजी यांनीं नित्यशः त्यांकडून पाठ करून घ्याव्या. लहानपणीं त्यांस पुष्कळ कविता मुखोद्गत असे. व पुढें तीच त्यांच्या अभ्यासक्रमास साधनीभूत झाली. मागाहून स्काटलंडांतून आलेले कांहीं मिशनरी यांनीं गिरगांवांत एक दोन मराठी व लहान इंग्रजी शाळा घातल्या. त्या शाळांपैकीं एका मराठी शाळेंत, त्रिंबकजी हे मुख्य शिक्षक होते. एतद्देशीयांचे विद्यावृद्धीस्तव ते वेळचे ज्या मिशनरी लोकांचे प्रयत्न चालू होते, त्यांमध्यें रेवरेंड राबर्ट मनी व रेवरेंड केनीसाहेब हे मुख्य होते.

### नोकरी पत्करली.

रेवरेंड राबर्ट मनी यांच्या इंग्रजी शाळेंत हरि केशवजी यांचें प्राथमिक शिक्षण झाल्यानंतर त्यांची

तैलबुद्धि व विद्याव्यासंग पाहून रेवरेंड केनी यांनीं त्
फावल्या वेळीं उच्च प्रतीचें इंग्रजी शिक्षण देण्याचा
ठेविला. पुढें इंजिनीयरिंग वगैरे शिल्पिक ज्ञानाचा मुंब
प्रसार व्हावा या उद्देशानें सरकारानें मुंबईंत क्याप
जर्विस ह्यांच्या देखरेखीखालीं एक इंजिनीयरिंग शा
काढली. त्या शाळेंत हरि केशवजी यांस मुख्य क्लार्क
जागा दिली. ते वेळीं मुंबईंत बाबा व्यास या नांव
प्रसिद्ध शास्त्री होते. त्यांकडेस जाऊन नोकरी संभाळून
यांनीं संस्कृताचा उत्तम अभ्यास केला.

ठाणें कोर्टांत हेड क्लार्क व ट्रान्स्लेटर.

सन १८२९ सालांत वरील इंजिनीयरिंग शाळेंतील मुख
क्लार्कची जागा सोडून हरि केशवजी यां
ठाणें अदालत कोर्टांत हेडक्लार्क व मरा
ट्रान्स्लेटरची जागा पत्करली. त्या जागे
ते सुमारें इसवी सन १८३४ पर्यंत होते. नंतर त्यां
हुषारी, विद्वत्ता, व कामाची कर्तबगारी पाहून त्य

सोलापूर कोर्टांत हेड क्लार्क.

सरकारांनीं सोलापुर येथील कोर्टांत मुख
क्लार्कचे कामावर नेमिलें. परंतु आप
वृद्ध पिते व चुलते व इतर घरची मंडळ
यांपासून दूर रहाणें न आवडल्यामुळें त्यांनीं ती जागा लवक

मुंबई अदालतकोर्टांत चीफ ट्रान्स्लेटर.

रच सोडून मुंबई येथें सदर दिवाणी अदाल
कोर्टांत (हल्लीचें हायकोर्ट अपिलेट साईड
चीफ ट्रान्स्लेटरच्या जागीं आपली नेम
णूक करवून घेतली. या जागेवर ते शेवटपर्यंत कायम होते

इ० सन १८४७ सालांत मुंबई सुप्रीम कोर्टाचे ( हल्लीचें हायकोर्ट ) चीफ ट्रान्स्लेटर मिस्तर मर्फी यांनीं पेनशन घेतलें. त्या वेळीं हरि केशवजी यांस सुप्रीम कोर्टांत कांहीं वर्षं चीफ ट्रान्स्लेटरच्या जागेवर नेमिलें होतें.

सुप्रीम कोर्टांत चीफ ट्रान्स्लेटर.

पुढें सुप्रीम कोर्टांत चीफ ट्रान्स्लेटरच्या जागेवर मिस्तर फ्लिन यांची कायमची नेमणूक झाल्यामुळें हरि केशवजी हे अदालतींत आपल्या चीफ ट्रान्स्लेटरचे जागेवर परत आले.

त्यांचीं सर्टिफिकिटें.

क्यापटन जार्ज जर्विस यांच्या इंजिनीयरींग शाळेंतील मुख्य क्लार्कची जागा सोडते वेळेस हरि केशवजी यांस क्यापटन जार्ज जर्विस यांनीं जें सर्टिफिकीट दिलें आहे, त्यावरून ते मराठी व इंग्रजी भाषांत प्रवीण असून उत्तम भाषांतरकर्त्ते होते, असें दिसून येतें.

अदालत कोर्टांतली नोकरी सोडून त्यांनीं जेव्हां आपली नेमणूक सोलापुरास अदालत कोर्टांत करून घेतली, त्या वेळीं ठाणें कोर्टाचे मुख्य जज्ज व सेशन जज्ज ए. बेल. इस्कायर यानीं त्यांस जें सर्टिफिकीट दिलें आहे, त्यावरून आणि मुंबई येथील अदालत कोर्टांतील जज्जांनीं वेळोवेळीं त्यांस जीं सर्टिफिकिटें दिलीं आहेत, त्यांवरून ते मोठ्या कुलीन घराण्यांतले असून विद्वान् व उत्तम भाषांतरकर्त्ते होते, असें होतें. त्यांतल्या कांहीं सर्टिफिकिटांचे उतारे यासोबत जोडिले आहेत. ( अंक १ ते ६ )

## आनरेबल जेम्स फेरीश.

एतद्देशीय लोकांत विद्येचा प्रसार व्हावा या उद्देश
सुमारें इ० सन १८२२ सालीं त्या वेळचे मुंबई इलाख्य
गव्हरनर आनरेबल मौंट स्टुअर्ट एल्फिन्स्टन यांनीं मुं
नेटिव्ह एज्युकेशन सोसायटी या नांवाची एक सं
स्थापित केली. त्या संस्थेचे आनरेबल सर जान मालक
मेजर जनरल हे अध्यक्ष होते, व सरकारी मोठे मोठे यु
पियन अधिकारी व मुंबईतील इतर विद्वान् व धनव
पार्शी हिंदू व मुसलमान गृहस्थ उपाध्यक्ष व व्यवस्थाप
वगैरे होते. ह्या व्यवस्थापक मंडळींत **आनरेबल जेम्**
**फेरिश** या नांवाचे एक विद्वान् युरोपियन गृह
होते. ते त्या वेळीं मुंबई कौन्सिलमध्यें एक सभासद अस
एतद्देशीयांत विद्येचा प्रसार व्हावा ह्मणून त्यांचे यत्न सत
चालू असत. ते पुढें कांहीं वेळ मुंबईचे आक्टिंग गव्हरनर
झाले होते. हरि केशवजी यांस ज्यांकडून उच्च प्रती
इंग्रजी शिक्षण मिळालें असे मागें लिहिलेले रेव्हरेंड केन
साहेब यांनीं आनरेबल जेम्स फेरीश यांशीं हरि केश
वजी यांची ओळख करून दिली. आनरेबल फेरि
साहेबांनीं त्यांची विद्वत्ता व विद्याव्यासंगाची उत्कट इच्छ
पाहून त्यांस आश्रय दिला, व त्यांचें त्यांजवर इतकें प्रे
बसलें कीं, ते स्वदेशीं गेले तेव्हां त्यांनीं त्यांस आपला बहुतेक
अमूल्य ग्रंथसंग्रह व बंगल्यांतील थोडें बहुत सामान त्यांस

बक्षीस दिलें. हे आनरेबल जेम्स फेरिश साहेब इ० सन १८४१ सालांत स्वदेशीं गेले. ते स्वदेशीं जाते वेळेस हरि केशवजी व मुंबईतील कांहीं विद्यार्थी मंडळी यांनीं मिळून त्यांस एक मानपत्र दिलें. त्यांतून कांहीं उतारे खालीं देतों.

### Address to the Hon'ble James Farish Esq.

To the Hon'ble James Farish Esq. member of Council, Bombay.

Hon'ble Sir—We the undersigned Natives, inhabitants of Bombay, most humbly beg to approach your honour with this address on the occasion of your proceeding to England, your native country. We cannot refrain from expressing our sincere regret for the loss which we shall experience in consequence of your departure. Hon'ble Sir, our hearts bear the lively impressions of your kindness and anxiety, which were invariably shown in attending to our wants, consulting our good, and giving us most useful instructions. We shall never forget the free and easy access to you which we enjoyed, notwithstanding your high station as Senior member of Council and still higher as Governor; and we shall make it our duty to imitate the laudable condescension with which you heard even the children of poor Natives read, especially on Sundays, teaching them such things as are calculated to promote their best and highest interests.

2d. Your unlimited benevolence and philanthropic acts on behalf of the Natives of this country,

directed to the amelioration of their moral anc
tellectual condition; your unrivalled generosity,
encouragement of the various and useful publica
in the Native languages; your uninterrupted cc
ction with *the Bombay Native Education S*
and with all the institutions which have *in* con
plation the public good; and even your per
labour in the cause of Native Education, often s
ficing that portion of your valuble time which r
have been given to ease and comfort, these
been from the most sincere and high motives, a
such a nature as to call forth public acknowl
ment. We humbly beg in consideration of
circumstances to observe that the appellation of "
Devoted Friend of India" may be rightly ap
priated to your honor. When we think of your
able disposition, your virtuous and pious life,
learning and talents; and the unwearied zeal,
strict justice, and impartiality with which your hc
filled the various stations of public life from
lowest to the highest, upwards of thirty years
are impelled to observe that these distinctions ca
equalled perhaps only by a few. Thus your
spicuous character which justly entitles you to a
found respect, will ever continue to be a
brilliant and durable ornament to the British Of
employed in the Civil service in India.

We remain Honourable Sir, your most obe
and humble servants,

HURREE KESSOWJEE and about 100 o
Bombay 26th February 1841.

वरील मानपत्र हरि केशवजी यांनीं तयार केलें होतें. त्याची भाषासरणी व समर्पकता किती गोड आहे, हें सांगणें नको. त्याविषयीं पत्रकारांचा अभिप्राय खालीं दिला आहे.

"This document, we consider as highly creditable to its authors, as it must have been gratifying to the honoured individual to whom it is addressed. Being the expression of heartfelt gratitude, for blessings really dispensed, it is more to be valued than the fulsome and indiscriminate addresses, which have so often been produced, more in the hope of securing future favour, than in the desire to acknowledge benefits actually bestowed. Let all mark the feeling of those who actually receive religious instruction in this place."—

"The Native's Friend." No. 10 March, 1841.

ह्या मानपत्रास आनरेबल जेम्स फेरिश साहेब यांनीं जें उत्तर दिलें आहे, त्यांतून कांहीं उतारा खालीं देत आहें.

To Hurree Kessowjee and those who have presented me the present address.

My friends,—I receive with the very warmest acknowledgements your good wishes towards myself and family, on our departure from India, and your expressions of thankful recollection of any measure of usefulness which it may have been in my power to extend to any of you. The friendly intercourse I have enjoyed with some of you for many years, has, I trust, been useful to us both.

Farewell—I shall often remember you with mu
pleasure and always derive the highest gratificati
from hearing of your advances in those things whi
will lead you to true excellence.

26th February 1841. } Your sincere frien
J. Farish.

वरील उत्तरावरून दिसून येतें कीं, आनरेबल जेम्स फेरि
हे मोठे धर्मशील असून त्यांची एतद्देशीयांवर प्रीति
त्यांसंबंधीं त्यांस कळकळ फार असे.





# भाग तिसरा.

## त्यांचे ग्रंथ.

मिस्तर जान बापेल व मागें लिहिलेले क्यापटन जार्ज जर्विस हेही एज्युकेशन सोसाइटीच्या व्यवस्थापक मंडळींत सभासद होते. शास्त्रीयविषयक व इतर शालोपयोगी ग्रंथ प्रसिद्ध करण्याचें काम त्यांकडेस होतें. त्यांनीं इ० सन १८३३ सालीं हरि केशवजी यांकडून Conversations on Natural Philosophy या शास्त्रीय ग्रंथाचें मराठी भाषांतर करविलें. "सिद्धपदार्थ-विज्ञानशास्त्रविषयक संवाद" असें या भाषांतराचें नांव आहे. हा भाषांतररूपानें केलेला ग्रंथ हरि केशवजी यांनीं ते वेळींचे मुंबईचे गव्हरनर राईट आनरेबल जान अर्ल आफ् क्लेयर यांस अर्पण केला आहे असें खालीं दिलेल्या अर्पण-पत्रिकेवरून दिसतें.

सिद्धपदार्थविज्ञान-शास्त्रविषयक संवाद.

### अर्पणपत्रिका.

To, The Right Honrable

JOHN EARL OF CLARE,
Governor of Bombay.

My Lord,

The slight degree of the knowledge of the English language and the elements of Natural Philosophy

which I possess, having been conveyed to me thro
the means of your benevolent and learned connt
men, the patrons of the arts, Sciences and civilizati
—naturally produced in me a desire of communicat
it to my Conntrymen as an efficacious means of sec
ing their moral and intellectual improvements
thus promoting the amelioration of their condition
This desire through the kind assistance of my frier
and the liberal patronage of that most useful Insti
tion which was wisely founded by the Honora
Mount Stuart Elphinstone and generously protec
both by Sir John Malcolm and Your Lordship, is
some measure gratified, in consequence of my hav
become the instrument of producing this work, wh
as a sincere tribute of high respect from a Nat
subject is dedicated with profound deference to Yo
Lordship, who is the distinguished Promoter
Learning and especially of Native Education.

I remain
My Lord
Your most obedient and hum
Servant.

TANNA,
*11th August 1832.*

HUREE KESSHOWJEE

Som-Wanshi Kshatriya Patha
Assistant to the Head Clerk, Tann
Adawlut, and Member of the Tra
lating Committee of the Bomb
Native Education Society.

हें भाषांतर बहुधा दुर्मिळ आहे. पदार्थांचे सामा
धर्म, गुरुत्वाकर्षकत्व, चलननियम, यांत्रिक शक्ति, ज्योति

शास्त्र, ग्रह, पृथ्वी, सूर्य, चंद्र, प्रवाही पदार्थांचे धर्म, दर्शनानुशासन इत्यादिक अनेक विषयांचें विवेचन या ग्रंथांत उत्तम रीतीनें केलें आहे. हें भाषांतर वाचतांना तें इंग्लिश ग्रंथाचें भाषांतर आहे असें मुळींच दिसत नाहीं. याची भाषा प्रौढ असून सोपी आहे. अस्ताचे वेळीं क्षितिजरेषेसमीप जातां सूर्य आपणांस स्पष्ट दिसतो; तद्विषयीं मिल्टन कवि यांनीं आपल्या एका ग्रंथांत पद्यरूपानें दिलेलें मोठें रमणीय वर्णन मूळ ग्रंथांत घेतलें आहे. त्याचें भाषांतर हरि केशवजी यांनीं या भाषांतराच्या ग्रहविवेचनभागांत आर्याछंदानें दिलें आहे. तें असें:—

## आर्या.

सूर्यास्तीं कपिशांगी संध्यारमणी करावया केली ।
नीलांधकार वसना नेसुनि आकाशमंदिरीं ठेली ॥ १ ॥
तीणें त्या निजवस्त्रें आच्छादुनि टाकितां दिशावदनें ।
पशुपक्ष्यांनीं जाणों आश्रयिलीं तद्भयें निजें सदनें ॥ २ ॥
मौनें संगति धरिली संध्येची मग तृणाचिया शयनीं ।
पशु कोट्यांत पतत्री रमती निद्रा तशीच तन्नयनीं ॥ ३ ॥
ऐशांत बापुडी ते कोकवधू स्पष्ट एकटी पडली ।
गातां पतितें तिजवरि मौनाची सुप्रसन्नता घडली ॥ ४ ॥
मग शुक्रवीर तारा सेना घेऊनि जाहला प्रकट ।
त्याणें निजतेजानें बहुधा तम नाशिलें भयासकट ॥ ५ ॥
यापरि तिमिरमलातें क्षालुनि तेजोजलें नभीं टिकला ।
भासे दिगंगनांनीं नाहुनि तो भालिं लाविला टिकला ॥ ६ ॥

विजयश्रीनें वरिला सेनानी शुक्र त्याशि देखाया ।
घेऊनि चंद्रराजा आपण विश्रांति त्याशि दे खाया ॥ ७ ॥
तेजःपुंज कलानिधि जाणों त्याला सुरौप्य कवचाला ।
अखिल तमोरिकुलातें नासुनियां विजय पावता झाला ॥ ८ ॥

भाषांतरांतून एक उतारा.—

गु०—प्रकाशकिरण डोळ्यांच्या कनीनिकेंत प्रविष्ट होऊन, नेत्रगोलकाचे आंतल्या भागीं जे दर्शनज्ञानतंतू असतात, त्यांजकडेस जातात; आणि तेथें आपण ज्या पदार्थापासून परावर्तन पावले, त्याची आकृति, रंग काढून, तो पदार्थ जसा असेल तसा उत्पन्न करितात; इतकेंच कीं त्याचें स्वाभाविक महत्त्व त्या आकृतींत आणीत नाहींत. आतां आपण पुनः या खोलीची खिडकी लावून, त्या खिडकीस जें छिद्र आहे, त्यामधून इजमध्यें प्रकाश येऊं देऊं, ह्मणजे तुझ्या डोळ्यांच्या दर्शनज्ञानतंतूंवर जशी पदार्थाची आकृति उत्पन्न होते, तशी या छिद्राचे सन्मुख जो भिंतीचा प्रदेश किंवा स्वच्छ वस्त्र, त्याजवर पदार्थाची आकृति उत्पन्न होईल, अशी कीं ती तुला यथास्थित दिसूं येईल.

ह्या उताऱ्यांवरून हरि केशवजी यांची भाषासरणी व कविता किती प्रौढ आहे हें दिसून येतें.

एज्युकेशन सोसाईटीच्या व्यवस्थापक मंडळीचे सभासद.

सन १८३१ सालीं हरि केशवजी यांस एज्युकेशन सोसाईटींत ग्रंथ प्रसिद्ध करणाऱ्या कमिटीमध्यें सभासद नेमिलें. त्या सालापासून ते सन १८५१ सालपर्यंत, ते सभासद

कायम होते. त्या सालानंतर पुढें त्या संस्थेचें काम सरकारानें आपल्या हातीं घेतलें.

रसायनशास्त्र.

हरि केशवजी यांनीं सिद्धपदार्थविज्ञानशास्त्राचा ग्रंथ भाषांतररूपानें प्रसिद्ध केल्यानंतर एज्युकेशन सोसाईटीच्या सूचनेवरून Conversations on Chemistry या शास्त्रीय ग्रंथाचें मराठी भाषांतर केलें. हें भाषांतर १८३७ सालीं प्रसिद्ध झालें. हें भाषांतर हल्लीं बहुधा दुर्मिळ आहे. वर लिहिलेले आनरेबल जेम्स फेरिश यांस हरि केशवजी यांनीं हें भाषांतर अर्पण केलें आहे, असें खालील अर्पणपत्रिकेवरून दिसतें.

## अर्पणपत्रिका.

To the Honorable JAMES FARISH, Esquire,
Member of Council,
Bombay.

Honored Sir,

The condescension, cheerfulness and solicitude with which, notwithstanding your high station, you explained this as well as the former work on Natural Philosophy, and revised sentence by sentence the whole of their extensive versions, are most conspicuous favours among those for which I already stand indebted since my recommendation to your

patronage by our kind friend, the Revd. R. Ker
more than ten years ago. In grateful acknowle
ment of these deep obligations, I am induced
dedicate, most humbly, to you, Sir, who are dist
uished and zealous Patron of Virtue and Na
Education, this translation of Conversations
Chemistry, attempted for the purpose of impartin
my countrymen some knowledge of the true p
ciples of a science of great importance to the pu
good and for the furtherance of general informati

The desire to shew that the promotion of th
objects is duly appreciated, will, it is hoped, prove
be a lasting motive to the present and rising gene
tions, to perpetuate a pleasing remembrance of
truly laudable efforts of those illustrious pers
who like yourself, are hastening on the dawn
Civilization and Happiness, till it shines with
splendor on this part of India.
Bombay 3rd September 1835.

I remain,
Honored Sir,
Your most Obedient and Humble Servant
HURREE KESHOWJEE,
Clerk in the Sudder Adawlut a
member of the Translation co
mittee of the Native Educati
Society.

राजमंत्रीस्थानापन्न
जेम्स् फेरिश साहेब वास्तव्य मुंबई यांप्रति
सदर अदालतसंबधीं भाषांतरकार हरि केशवजी वास्त

मुंबई गिरगांव विज्ञप्ति ऐशीजे सन्मार्ग व एतद्देशीय जनांची शिक्षा यांचे प्रवर्तनार्थ आपले विख्यात उद्योग चालिले आहेत, आणि आपले इष्ट कारुणिक केनीसाहेब यांहीं मला आपल्या आश्रयास निरवून १० वर्षें झालीं त्या दिवसापासून तर आजपर्यंत आपण मजवर कृपाच करीत आलां आहां. परंतु सिद्धपदार्थविज्ञान ह्मणून जो पूर्वीं माझे हातून ग्रंथ झाला, तो व हा ग्रंथ आपण इतक्या थोर अधिकारारूढ असतां मला दयेनें, उत्साहानें, व आस्थेनें सांगितला व त्याचें व याचें जें अवघें मोठें भाषांतर झालें तें पंक्तिशः शोधिलें, तेणेंकरून तर मजवर आपली सर्वप्रसिद्ध कृपा झाली आहे. हे आपले परमोपकार मी मनोभावें आठवीत आहें, आणि या देशावर सुवर्तमानाचा व सुखाचा सूर्य पूर्ण तेजानें प्रकाशावयास आपल्यासारिख्या प्रकाशितकीर्ति पुरुषांचे यथार्थ स्तुत्य प्रयत्न चालिले आहेत, त्यांस ज्ञानकल्याणदायक असें मानून त्यांचें आनंदजनक स्मरण वर्तमान व भावी लोकांसही नित्य राहील असा भाव धरून ज्ञानकल्याणप्रवृत्ति करण्याविषयीं अति कुशल जें शास्त्र त्याचा शुद्धांश अस्मद्देशीय जनांस प्राप्त व्हावा या हेतूनें आरंभिलेला व आपल्या साहाय्यानें सिद्धीस गेलेला जो रसायनसंवादभाषांतररूपग्रंथ आपल्या सकृतज्ञतोद्देशें परम विनयें करून अर्पिला असे. हे विज्ञप्ति. शके १७५७ मन्मथनाम संवत्सर भाद्रपद शुद्ध एकादशी गुरुवार.

भाषांतराच्या आरंभीं ग्रंथविषयदिग्दर्शनार्थ मुखपृष्ठ
एक श्लोक लिहिलेला आहे. तो व त्याचा इंग्रजींत भा
दिला आहे तो असा.

शिल्पातें कृषिवैद्यकांस मिरवी धात्वौषधींच्या गुणां ।
संयोगादि पृथक्कृतींस गहना तत्वादिकांच्या खुणा ॥
नेत्रीं दावुनी ईश सन्मति सदा संसारसौख्यास दे ।
कंठीं रत्नरसायनाख्य बरवें घाला हरी हें वदे ॥ १ ॥

A PRACRIT STANZA

"Wear round your neck says Hurree this Excell
Jewel-like work on chemistry. It gives occu
demonstration of the properties of mineral
vegetable substances, the complicated nature of s
thesis, annalysis and similar other phenomena as v
as the characters of simple bodies. It materia
promotes the ends of the useful arts, manufactu
Agriculture Pharmacy &c. It does not only in an
failing manner extend the sphere of the luxuries
happiness of human life but inspires the mind w
true devotion towards the Deity."

वरील अर्पणपत्रिकेवरून दिसून येईल कीं, हरि केश
यांची आनरेबल जेम्स फेरिश यांजवर पूज्यबुद्धि असून
पल्यास विद्याभूषित करण्यास त्यांनीं जे श्रम घेतले त्यांस
आपली कृतज्ञता दर्शित केली आहे.

या भाषांतरांत शास्त्रीय विषयाचें विवेचन सोप्या भा
केलें आहे. व भाषांतर वाचतांना तें भाषांतर आहे

मुळींच दिसत नाहीं. विषय प्रतिपादन करितांना यंत्राच्या आकृती दिल्या आहेत. ह्या भाषांतराच्या प्रति खुद्द एज्युकेशन सोसाईटीनें दर प्रतीस दहा रुपयेप्रमाणें ५०० प्रति ठेविल्या. ह्यावरून हा भाषांतररूपी ग्रंथ मोठ्या महत्त्वाचा आहे असें सहज दिसतें.

इंग्लंडाचा वृत्तांत.

आनरेबल जेम्स फेरिश यांचे सूचनेवरून सन १८३८ सालीं हरि केशवजी यांनीं History of England इंग्लंडाचा वृत्तांत या ग्रंथाचें भाषांतर केलें. ते वेळींचे मुंबईचे गव्हरनर सर राबर्ट ग्रांट यांस हें भाषांतर अर्पण केलें होतें असें अर्पणपत्रिकेवरून दिसतें.

ह्या भाषांतराच्या प्रती मुंबईत ते वेळीं फार खपल्या. हें भाषांतर आतां बहुधा उपलब्ध नाहीं.

यात्रिकक्रमण.

सन १८४१ सालीं स्काटिश मिशन सोसायटीकरितां हरि केशवजी यांनीं आनरेबल जेम्स फेरिश यांचे सूचनेवरून Bunnyan's Pilgrim's Progress या इंग्रजी ग्रंथाचें भाषांतर केलें. ह्या भाषान्तराच्या प्रती ५०० दर प्रतीस तीन रुपयेप्रमाणें खुद्द स्काटिश मिशन सोसायटीनें ठेविल्या. ह्यावरून हा भाषांतररूपी ग्रंथ सोसायटीस अति प्रिय व महत्त्वाचा वाटला होता असें दिसतें. या भाषांतरास नांव **"यात्रिकक्रमण"**

म्हणजे "इहलोकापासून परलोकास जाणें" असें दिलें आहे. हें स्वप्नाच्या रूपकानें सरळ लिहिलें आहे. हें भाषांतर आतां बहुधा उपलब्ध नाहीं. मूळ ग्रंथ संवादरूपानें लिहिलेला आहे; व कारणपरत्वें मध्यें मध्यें कविता लिहिल्या आहेत. त्या कवितांचें भाषांतरही आर्याश्लोकादि छंदांनीं भाषांतरांत दिलें आहे. त्या कवितांपैकीं कांहीं येथें दिल्या आहेत. त्यांवरून ग्रंथाचा विषय सहज ध्यानांत येईल.

### आर्या.

मी दुःखित अतिव्याकुळ कपाट उघडून आंत घे मातें ।
मी अपराधि खरा पण गाइन तुझ्या अगाध कीर्तीतें ॥ १ ॥

### अभंग.

येथें म्यां पाहिलें ऐकिलें जें कानीं, थोडे तेसें जनीं दिसे मज. १
हितकारी आणि संतोषदायक, भयही कारक दाखविलें. २
स्थिर बुद्धि राहे आरंभिल्या कार्यीं, ऐशी सोई मज कळविली. ३
हा बोध मजला राहो स्मरो नित्य, बोधकें साहित्य केलें माझें. ४
विसरेना कदा तयाच्या उपकारा, धन्य त्या दातारा, वानीतसें. ५

### आर्या.

पापाचें जें ओझें, वाहुन आलों किं येथवर पाहीं;
तेणें व्याकुल कष्टी, होतों परि या स्थलीं सुखें राहीं. १
हें स्थान कोण आहे, कीं येथुन त्या सुखास आरंभ;
मत्पृष्ठींचें ओझें, पडलें धरणीं असा बहुत लाभ. २
मृत्युस्तंभ प्रतापी, माझीं येथें किं बंधनें तुटलीं;
कबरीला किति वानूं, ओझ्याची सबळ ग्रंथि कीं सुटली. ३

ज्याचा प्रताप ऐसा तोच मला बहुत धन्य वाटे कीं;
माझ्या कार्यालागीं मृत्युस्तंभीं सलज्ज शिर टेंकी. ४

## चाल.

पर्वत हा बहु उंच दिसे परि इच्छित मानस त्यावरि जाया,
आडहि कांहिं तरी जरि येइल काय शिणेल हटेल हि काया;
जीवन तेथें असेल असत्य असा मनिं बोध हो निश्चित झाला,
सत्वर निर्भय येइं मना तरि पूर्ण करी मन हेतु उदेला. १

दुर्गम कष्टद आहे परि दिठि दावित लक्ष्य असा पथ आहे,
जाइं तयांतुनि आदरें निश्चित चालें तयामधें नित्य तु राहें;
लक्ष्य न दावुनि दुःखद अंतिहि जो पथ आहे असा कुमताचा,
जाणें सुखें असलें परि त्यांतुन इच्छि निरंतर त्याग तयाचा;

## अभंग.

आतां कोठें आहें मीहो कवण्या ठायीं,
येऊनियां राहीं सौख्यस्थानीं १
देवलोकाच्या हें जवळील स्थान,
निर्मियेलें जाण विश्रांतिशीं. २
माझीं पापें क्षमा करूनि दयाळा,
सांभाळिलें मला ऐशा रीती. ३
यात्रेकरू त्यांची, किती प्रीति चिंता,
वाहाशी सर्वथा इशु चित्तीं. ४

## श्लोक.

आश्चर्य हें थोर दिसेच लोकीं, मातें कसें रक्षियलें विलोकीं;
त्या घोर विघ्नांतुनियां मला हो, नेलें दुरी हाच अतुल्य लाहो. १

या खोऱ्यांत मला पिशाच नरकें पापें तमें वेष्टिलें,
गर्तापाशहि जाळ दुःखद मला यांनीं पथीं कष्टिलें;
तेव्हां तो स्वकरें सुरक्षित करी तो धन्य वाटे मला.
कीर्तीचा शिरिं ज्याचिया मुकुट त्या मी वर्णितों निर्मला. २

इशूनें मला रक्षिलें पामराला, तयाच्या कृपें शोक सारा विराला;
तयावीण मी गुंततों पाशबंधें, ह्मणूनी तया गातसें मी प्रबंधें.

## श्लोक.

मानी ईश्वर वाक्य जो नर तया विघ्नें कसूं पाहती,
तीं देहाश्रित कीं अनेक असतीं चित्ता सदा मोहिती,
त्यांतें दूरि करीं तयांहुनि पळें सोडूनियां सत्वरीं,
ऐसें निश्चित तूं जरी न करिशी तूं गुंतशी तत्करीं. १

सन्मार्गि जो चालत एक भावें,
यात्रेकरू नाम तया वदावें,
तेणें सदा सावध कीं असावें,
लज्जादि विघ्नाशिं बळें त्यजावें ॥ २ ॥

## चाल दिंडी.

पहा तुह्मी निर्झर स्वच्छ कीती, थोर मार्गा समीप हे वहाती,
हरित वर्णे उपवनें शोभताती, मधुरगंध यांतून कसे येती १
सुरस ऐशा उत्तम वस्तू येथें, यात्रेकरू भोगिती याच पंथें,
समाधान व्हावया तयांलागीं, निर्मियेले उपभोग याचि जागीं. २

हेच वृक्ष गोमटीं फळें देती, गोडपत्रें वाणुं मी यांस कीती,
स्वाद यांचा लागतां जया जना, विकुनि सर्व घेईल याची वना. ३

## पृथ्वीवृत्त.

सुमार्ग गति सोडुनी क्रमियली पहा भूमि ती,
निषिद्ध ह्मणुनीच दुःखतरि भोगिलें हो किती,
परंतु जन येति जे सुमन आमुच्या मागुतें,
धरोत अवधान तत्पर सदाच राहोत ते. १

असें न करतील ते अनवधान त्यांलागुनी,
जसें भ्रमविलें अह्मांस भ्रमवील हो त्रासुनी,
प्रभुत्व भ्रम दुर्गिचें मिरवि नष्ट आशा करी,
अशा प्रभु अधीन होति पथ सांडिती ते जरी. २

नीतिग्रंथ.

सन १८४६ सालांत एज्युकेशन सोसायटीकरितां हरि केशवजी यांनीं "Chamber's Moral Class Book" या ग्रंथाचें भाषांतर मराठींत केलें. मूळ ग्रंथ शिक्षणखात्यांत सरकारी शाळांतून पुष्कळ वर्षं अभ्यासक्रमांत चालू होता. हें भाषांतर "नीतिग्रंथ" ह्या नांवानें प्रसिद्ध होतें. ह्या ग्रंथांतील विषयांची अनुक्रमणिका आर्याश्लोकछंदानीं ग्रंथारंभीं दिली आहे. ती फारच रमणीय असल्यावरून येथें दिली आहेः—

## श्लोक.

प्राणी, आप्त कनिष्ठ श्रेष्ठ जन जे त्यांतें सदा सन्मतें ।
वर्त्ते उद्यम, स्वात्मसेवकपणा स्वातंत्र्य धारिष्ट तें ।
यांतें पोषुन लक्षपूर्वक करी विस्तीर्ण आलोचना, ।
संपादीं पटुयुक्ति सूचनलता, संकोचता सज्जना. ॥ १ ॥

घे घे सभ्यपणा, सुयुक्त अशना, आरोग्यसंवर्द्धना, ।
संतुष्टत्वगुणा, मितव्ययपणा, लोकोपकारीमना ।
अक्रोधादिक क्षांति हीच सुमना, भोगीं क्षमा सद्धना, ।
सौम्यत्वादिक भूषणा धरिं रमें यां सद्गुणांच्या वना. ॥ २ ॥

## आर्या.

अंतरसाक्षित्वातें सहन नव्हे कीं अनीतिलव एक ।
लक्षुनि तें, व्यापारा नीतीचें येउंदे सदा पीक ॥ ३ ॥
परधन, लौकिक, सत्ता; निजकर्तव्यें अवश्य जीं प्राप्त, ।
निजऋण, तूं या सर्वांविषयीं वर्तन करीं यथा उचित. ॥ ४
स्वहिताचें संपादन यद्यपि जें साध्य नीच रीतीनें ।
त्यातें वर्जी, न्याय्य व्यवहारीं वर्त तूं यथाविधिनें ॥ ५ ॥
पाळीं स्वदत्त वचना, स्वैच्छिक अपकार वर्जुनी सारे ।
परदुःखादिक न करीं, अंतरसाक्षी निषेधितो बा रे ॥ ६ ॥

## श्लोक.

जें सत्य तें सेवित नित्य जावें । महात्मता, शौर्य गुणास घ्या
स्वदेशप्रीतीस मनीं धरावें, । नीतीस रे सौख्य दया भजावें ॥ ७

सरकारी व मिशनरी शाळांत मागें बहुत वर्षेंपर्यंत
भाषांतर अभ्यासक्रमांत चालू होतें.

देशव्यवहार व्यवस्था.

सन १८५१ सालीं डेक्कन ट्रान्स्लेशन सोसायटी
Mrs. Marcet's Conversations अ
Mill's Treatise या ग्रंथांच्या आधार
Political Economy या विषयावर महाराष्ट्र भा

ंथ तयार करविला. "देशव्यवहारव्यवस्था" हें ह्या ंथाचें नांव आहे. मार्सेट व मिल्ल यांच्या ग्रंथांतील नेवडक भागांचें या ग्रंथांत भाषांतर आहे. रावसाहेब वेश्वनाथ नारायण मंडलिक हे ते वेळीं एल्फिन्स्टन काले- ांत नार्मल स्कालर होते, त्यांचे हातून व हरि केशवजी ांचे साह्यानें हा ग्रंथ तयार झाला. ग्रंथरचनेचें काम ुधा हरि केशवजी यांनी केलें, असें ते वेळींचे कमिटीच्या रेपोर्टावरून दिसतें. हरि केशवजी यांची विद्वत्ता, मार्मिक ीतीनें भाषांतर करण्याची त्यांची शैली, व त्यांच्या शांत व ौम्य गुणांची प्रशंसा या रिपोर्टांत व्यक्त केली आहे. या रेपोर्टांतून कांहीं भागाचा उतारा खालीं देत आहों:—

"A work in Marathee on Political Economy o be founded on Mrs Marcet's Conversations and Iill's Treatise and to bear an appropriate title."

Mr. Hurree Kesowjee who is well known as a ranslator of many useful works, having rendered into Iurathee the greater portion of Mrs. Marcet's Con- ersations on Political Economy, offered to complete is translation for the Society.........Mr. Green having indly volunteered his assistance in having the work repared in this way, the Committee considering he importance of placing within the reach of the Iurathee reader some knowledge of the interesting cience of political economy, resolved that the com- ilation should be proceeded with; and that Rs, 1200 hould be set apart for it. Of that sum, a portion

amounting to Rs. 900, the Committee agreed
grant to Mr. Hurree Kesowjee on the completio
his version; and the remaining Rs. 300 having b
placed at the disposal of Mr. Green, are to be app
by him to the remuneration of one of the nor
scholars of the Elphinstone Institution, whom
proposed to employ under his direction. The Co
mittee have recently had the pleasure of receiv
from Mr. Green the following interesting det
relative to the plan and progress of the work.

"The moment" writes Mr. Green "the Co
mittee accepted our joint offer, I sat down with H
Kesavji, and marked all the parts of Mrs. Marc
book which we considered might be remodelled w
advantage to the cause of good feeling and scient
truth.........Accordingly on being removed to Poo
almost the first work I engaged in was to draw
this plan, sending it, with ample instructions a
references to various sources of information
Vishwanath Narain, the most distinguished of
normal scholars in the Elphinstone College. Betw
him and Huri Keshavji the work was shared in
following manner; Wishwanath Narain was ma
responsible for all the *matter* and Hari Keshavji
all the *language*, while the task of rendering
whole into familiar dialogue adapted to the pres
state of native thought and information and of find
*Indian* illustrations of the various topics discuss
was to be shared between them—though the grea
part of this probably falls to the lot of Hari Kesha
Hari Keshavji's thoroughly amiable disposition, a

s earnest desire to see a really good book produced
.ve insured his very cordial co-operation in all
ese arrangements; and I am sanguine that we shall
ve a most valuable Marathi treatise.

"The work as it proceeds, is sent for a final
vision to Poona. It is there read to a large Com-
.ttee, consisting, in addition to myself, of the most
:elligent of the Shastris and English students in the
w College,—a few of the more promising of the
unger students being also admitted to play the part
Molier's old woman to whom he read his comedies.
le portions which Hari Keshavji and Wishwanath
ve hitherto sent namely the "Introduction" and
'art I." have been read in this manner, and have
en the greatest satisfaction to this Committee;
d I understand that the remainder of the work is
a state of great forwardness, and that I may
pect much the greater portion of it at Poona, also
mediately."

ीय ज्ञानदर्शन.

पुढें सन १८५६ सालीं ह्याच डेक्कन ट्रान्सलेशन सोसायटीनें सखाराम रामचंद्र दीक्षित आणि विष्णु अमृतराव ह्यांजकडून Guide Scientific Knowledge ह्या ग्रंथाचें भाषांतर करवून हरि केशवजी आणि कृष्णशास्त्री भाटवडेकर ह्यांजकडून ासविलें. त्याचें नांव "शास्त्रीय ज्ञानदर्शन" असें आहे. ग्रंथ संवादरूपानें लिहिला आहे. सृष्टपदार्थांचे गुणधर्म, क, व ते परस्परांशीं संलग्न झाल्यानें रासायनिक क्रियेचे

योगानें त्यांचें रूपांतर कसें होतें व गुणधर्म कसे बदलतात याविषयीं या ग्रंथांत उत्तम विवेचन केलें आहे.

वर लिहिल्याप्रमाणें हरि केशवजी यांनीं भाषांतररूपानें एकंदर ग्रंथ केले तेः—

१ सिद्धपदार्थविज्ञानशास्त्र.

२ रसायनशास्त्र.

३ इंग्लंडाचा वृत्तांत.

४ यांत्रिकक्रमण.

५ नीतिग्रंथ.

६ देशव्यवहारव्यवस्था.

७ शास्त्रीय ज्ञानदर्शन.

या ग्रंथांपैकीं बहुतेक ग्रंथ प्रस्तुत उपलब्ध नाहींत.





# भाग चवथा.

## त्यांचे सार्वजनिक कामांत परिश्रम.

आपला उद्योगधंदा सांभाळून विद्यावृद्धीचे कामीं त्यांचे जसे परिश्रम चालू होते, तसेंच सार्वजनिक कामांतही त्यांचा हात असे.

## स्टुडन्टस लिटररी अँड सायन्टिफिक सोसाइटीचे सभासद.

बोर्ड आफ एज्युकेशनकडून स्थापित केलेल्या मराठी व इंग्रजी शाळा, एल्फिन्स्टन हायस्कुल, एल्फिन्स्टन कालेज इत्यादिकांत जें शिक्षण देण्यांत येत असे, त्याचा लाभ द्रव्य-सामर्थ्य नसल्यामुळें सर्वांसच मिळत नसे. ह्मणून सन १८४८ सालाचे सुमारास ते वेळींचे धनवान् विद्वान् गृहस्थ सर जम-सेटजी जीजीभाई बारोनेट, आनरेबल जगन्नाथ शंकरशेट, नाखोदा रोगे, वगैरे मंडळीनें स्टुडन्टस लिटररी अँड सायन्टि-फिक सोसायटी या नांवांची संस्था स्थापित केली. त्या संस्थेचे ते वेळीं प्रोफेसर हेनरी ग्रीन, दादाभाई नौरोजी, डाक्तर भाऊ दाजी, नारायण दिनानाथ, महादेव गोविंद शास्त्री, विनायकराव वासुदेव, रावसाहेब विश्वनाथ नारायण मंडलिक, नानाभाई

दांडेकर, भास्कर दामोदर पाळंदे आदिकरून सभासद होते. ह्या संस्थेकडून मुंबईंत मराठी व गुजराथी मुलांच्या व मुलींच्या शाळा घालण्यांत आल्या. त्यांपैकीं कांहीं हल्लीं चालू आहेत. या संस्थेच्या निरनिराळ्या विषयांसंबंधानें निरनिराळ्या शाखा स्थापिल्या होत्या. मराठी ज्ञान-प्रसारक सभा, व गुजराथी ज्ञानप्रसारक सभा ह्या त्या संस्थेच्या शाखा होत्या.

## मराठी ज्ञानप्रसारक सभेचे उपाध्यक्ष.

हरि केशवजी हे सन १८५२ सालीं मराठी ज्ञानप्रसा-रक सभेचे उपाध्यक्ष होते. इतर विद्वान् सभासदांप्रमाणें त्यांकडूनहि ह्या संस्थेस मदत होत असे. ह्या संस्थेच्या सन १८५२ सालाचे रिपोर्टांत त्यांसंबंधीं खालीं लिहिलेला उल्लेख केला आहे:—

"In connection with this school series we have to express our obligations to Mr. Hari Keshavjee, our vice President of the Marathi Branch Society, for the valuable assistance rendered by him in supplying several pieces of poetry original and selected."

"Essay on Education was read by Mr. Hari Keshavjee also."

हा निबंध उपलब्ध नाहीं.

## डिस्ट्रिक्ट बेनिव्होलेन्ट सोसायटीचे सभासद.

सुमारें सन १८३० सालीं आनरेबल जेम्स फेरिश,

डाक्तर सीटन, क्यापटन क्यांडी व इतर मुंबईंतील मिशनरी यांनीं ते वेळींचे मुंबईचे गवरनर आनरेबल सर राबर्ट ग्रान्ट यांच्या आश्रयाखालीं Native Poor Asylum या नांवाची संस्था स्थापिली. निराश्रितांस अन्नवस्त्र व राहण्यास जागा देणें हा ह्या संस्थेचा मुख्य उद्देश होता. पुढें ही संस्था मोठ्या प्रमाणानें वाढली. सर जमसेटजी जीजीभाई, नाईट, ह्यांनीं ह्या संस्थेकरतां धर्मार्थ एक मोठी धर्मशाळा बांधून दिली. ह्या संस्थेस पुढें " The Bombay District Benevolent Society" असें नांव देण्यांत आलें. सन १८४५ सालीं ते वेळींचे मुंबईचे गव्हर्नर सर जार्ज आर्थर, बॅरोनेट, हे ह्या संस्थेचे पेट्रन होते. आनरेबल सर जेम्स फेरीश, सर जमसेटजी जीजीभाई, नाईट, वगैरे मुंबईंतील मोठी मंडळी तहाहयात सभासद होती. सन १८३५ पासून ते १८४५ सालापर्यंत हरि केशवजी हे ह्या संस्थेचे जाइंट सेक्रेटरी होते.

**स्वज्ञातिसुधारणेच्या व हिताचे कामीं त्यांची मदत.**

स्वज्ञातीच्या सुधारणेसाठीं व हिताकरितां हरि केशवजी यांचे यत्न निरंतर चालू असत. ज्ञातींत उद्भवणारीं ग्रामण्यें मोडणें, ज्ञातींतील विघातक चाली व रिवाज बंद करणें इत्यादि कामांत ज्ञातींतील प्रमुख मंडळींत ते पुढें असून नेहमीं त्यांस सल्ला देत असत. ज्ञातींत पुनर्विवाहाचा रिवाज सुरू झाल्यानंतर तिला बरेच अडथळे येऊं लागले. सबब

सन १८२७ सालीं हरि केशवजींच्या व ज्ञातींतील इतर प्रमुख मंडळीच्या उद्योगानें, ज्ञातीचें महास्थान मालाड तालुके साष्टी येथील ज्ञातीचे प्रमुख देसाई यांकडेस ज्ञातीची महासभा (परिषद्) करण्यांत येऊन, पुनर्विवाह व इतर बाबतींत सभापत्र होऊन नियम करण्यांत आले. तेव्हांपासून पुनर्विवाह वगैरेसंबंधीं विशेष अडचणी येत नाहींत. ज्ञातींतील निराश्रितांस यांकडून बरीच मदत होत असे.





# भाग पांचवा.

## त्यांचीं धार्मिक मतें.

मागें लिहिल्याप्रमाणें हरि केशवजी यांचा अभ्यासक्रम पुरा झाल्यानंतर ते पुढें रेवरेंड पाद्री केनी यांचे समागमांत राहिल्यानें त्यांची हिंदु धर्मावरून श्रद्धा दिवसेंदिवस ढांसळूं लागली. हें पाहून त्यांचे आजे गोपाळजी यांनीं मागें लिहिलेले शामराजतात्या केसकर यांबरोबर त्यांची गांठ घालून दिली. शामराजतात्यांनीं धर्मसंबंधीं त्यांचे शंकांचें सप्रमाण समाधान करून त्यांचा धर्मविरुद्ध असलेला भ्रम दूर केला, व ते त्यांचे पट्टशिष्य बनले. तात्यांनीं त्यांस ज्ञानेश्वरी स्वमुखानें सांगितली; व ते वेदांतविषयांत मोठे प्रवीण झाले. गीता, ज्ञानेश्वरी, भागवत, विवेकसिंधु, अमृतानुभव, एकनाथी भागवत हे त्यांचे आवडते ग्रंथ झाले, तात्यांचें त्यांवर इतकें प्रेम बसलें कीं, मुंबईत असतांना हरीवांचून त्यांस गमत नसे. एकदा एक शिष्यसांप्रदायिकाकडेस कीर्तन चाललें असतां, तात्या महाराजांनीं त्यांस उद्देशून खालील आर्या ह्मटली.

> केशवउदरसुगर्भीं अवतरला पूर्ण तो कृपाळु हरी ।
> सुजनजना पाहुनियां सिंधुपणें येत ज्या कृपालहरी ॥ १ ॥

तात्या महाराजासंबंधीं हरि केशवजी यांनीं बरीच कविता

केली होती; परंतु ती सर्व उपलब्ध नाहीं. एक दोन पदें सांपडलीं तीं येथें देतों.

भवसागरतारक, श्रीगुरुराज स्वामी माझा ॥ ध्रु० ॥
या संसारापासुनी मजला उतरुनि केलें पार रे ॥ १ ॥
ग्रासुनि भवभ्रांतीचें पडळ दावित निजसुखसार रे ।
शामराज श्रीगुरुपद वंदुनि, करि हरि जयजयकार रे ॥ २ ॥

ब्रह्म सनातन पाहें उघडें, व्यापक तो ब्रह्म० ॥ ध्रु० ॥
व्यापक तो जगदात्मा प्रकटुनि, बळकट धरीं तूं पाय उघडें ॥ १ ॥
निशिदिनीं हृदयीं छंद भरुनि आनंदें हरि गाय उघडें ॥ २ ॥
शामराजश्रीगुरुपद वंदुनि आनंदें हरि धाय उघडें ॥ ३ ॥

हरि केशवजी यांचे धार्मिक विचार कसे होते हें त्यांचे कांहीं हस्तलेख संग्रहीं आहेत ते वाचले असतां सहज कळून येईल. ते कर्मनिष्ठ असून मोठे भक्तिमान् होते. त्यांचें उपास्य दैवत श्रीरुक्मिणीपांडुरंग होतें, व ज्ञानेश्वर महाराजांचे ठायीं त्यांची अति दृढ भक्ति होती. नित्य ज्ञानेश्वरीचा पाठ करीत असत, व ही उपासना त्यांचेकडेस अझून परंपरेनें चालत आहे. त्या हस्तलेखांतून कांहीं वेंचे खालीं देत आहें.

### लेख ॥१॥

"श्री सद्गुरु सच्चिदानंदस्वरूप भगवान त्यातें नमस्कार असो, जो मनबुद्धीस चक्षुरादिइंद्रियांस अगोचर, नावरूपातीत हस्तपादादिअवयवविरहित असा असून सर्वव्यापक सर्वज्ञ सर्वनियंता परमकृपाळू सर्वशक्ति पतितपावन भक्तवत्सल

हा एकच असून आपल्या अचिंत्य शक्तीनें जगदादिक निर्मितो, पाळितो, त्यांचा संहार करून केवळ शुद्धस्वरूपेंकरून सकळ उपाधितीत असतो. यास केवळ शून्य मानणें अथवा सगुण उपाधियुक्त मानणें हा भ्रम. याणें देव, दानव राक्षस, भूतपिशाच, मनुष्य पशुपक्षि कीटकादि, तसेच तरु, तृण, लोह, पाषाण, सरित्, समुद्र, चंद्र, सूर्य, नक्षत्रादि तसेंच भूगोलादि दृश्य, तसेच स्वर्गादि चर्मचक्षूंस अदृश्य असे लोक आपण एकला एक असून कसे केले व कां केले असें मनांत आलें असतां स्वप्नदृष्टांतावरून समाधान करून घ्यावें. राजा स्वसुखें पर्यंकीं शयन केलें असतां स्वप्नांत अनेकविधा होतो तेथें मनांत आपल्यावांचून अन्य पदार्थ कोठून आणितो? बरें असें होत असतां आपल्या राज्य-वैभवांत किमपि अंतर पडलें आहे काय? नाहीं. बरें तो राजा स्वप्न मनांत कां आणितो? कांहीं विशेष सुख व्हावें ह्मणून काय? तर नाहीं. त्याचे सुखांत कांहीं कमती नाहीं. स्वप्नादि व्हावीं हा वस्तुस्वभाव. कारण, राजा ह्मटला ह्मणजे केवळ जड अचेतन पदार्थ नव्हे. ज्ञानवान् राजश्रियायुक्त आहे. कोणी ह्मणेल कीं दृष्ट श्रुत व्यवहारा-विषयीं स्वप्न पडतें त्यावरून पहातां एक आत्मा व त्याहून कांहीं द्वैत असे दोन पदार्थ अनादि सिद्ध आहेत असें होतें. अद्वैतसिद्धि होत नाहीं तर स्वप्न तसेंच रज्जु सर्प मृगजल इत्यादि विवर्तसूचक दृष्टांत ते सर्वोपरि युक्त आहेत असें नाहीं.

फार करून जवळ जवळ आहेत. सृष्ट पदार्थांवरून असृष्ट अपदार्थरूप अशा परमात्म्याचें स्वरूप यथास्थित कळूं लागलें तर त्याची यत्तता झाली. त्याचें अनंतत्त्व, अतर्क्यत्त्व बुडालें. त्याचे ठायीं जीवांचें परीएकदेशित्व प्राप्त होईल. अशा अडचणींकरितां माया अविद्या, प्रकृतिपुरुष, आवरण विक्षेप घटाकाश महादाकाश, महदग्नि विस्फुल्लिंग इत्यादि न्याय अशा अनेक युक्तींची कल्पना करावी लागली. सर्वांचें तात्पर्य कीं अधिष्ठानास परिणामादि दोष येऊं नयेत. सर्व विवर्तप्राय आहे असा बोध होऊन "एकं अद्वितीयं ब्रह्म नेहनानास्ति किंचन" इत्यादि वेदमहावाक्यांची सिद्धि व्हावी ह्मणून गुरु वेदांतादिक साधनें जीवाच्या कल्याणार्थ सांगितलीं आहेत. तिहींकरून युक्त होऊन ज्या भगवंताचें अचिंत्य सामर्थ्य त्यास अनन्य भक्तिपूर्वक शरण असावें. तर्क वितर्क सोडून, ज्ञानाभिमान उत्तम कुलाभिमान भूतद्रोह भेदबुद्धि सोडून नारायणाच्या कथा नामें इत्यादि सद्भावें गावीं, ऐकावीं, त्याचें कीर्तन करावें. हेंच नरदेहाचें परमभाग्य."

## वेद शास्त्रें पुराणें इत्यादिकांसंबंधीं त्यांचें मत.

### लेख ॥ २ ॥

"वेद शास्त्रें पुराणें इत्यादि केव्हां, कोठें, कोणीं केलीं यांविषयीं लोकांत अनेक वाद आहेत. कारण कोणी एक जण कोणास पत्र लिहितो त्यांत जसें आपलें, ज्यास लिहिलें

त्यांचें नांव, स्थळ, तिथी, मास, संवत्सर अथवा शक स्पष्ट लिहितो त्याप्रमाणें वेदादि लेखांत नाहीं. वेद ह्मणजे श्रुति, आगमादि; शास्त्रें ह्मणजे षड्दर्शनें; मन्वादि स्मृति; पुराणें ह्मणजे भागवतादि अष्टादश तसेंच भारत रामायण इतिहास हीं उपवेद आयुर्वेदादि व उपपुराणें सर्व अपौरुष वाणी, असें तत् तत् मतानुयायी मानितात. कालिदासादि-कृतकाव्यांस पौरुष वाणी समजतात. अपौरुष ह्मणजे साक्षात् ईश्वरवाणी तेथें भ्रमादि दोष नाहींत. त्यांत जें सांगितलें आहे तें सर्व सत्य. त्याजवर संशय घेणारा तो पाखांडी जाणावा. मनुष्यवाणी ह्मणजे पौरुष वाणी किती जरी सुरस रचना सत्यप्रतिपादक असली तरी ती ऋषी मुनी इत्यादिकांचे वाणीसारखी पवित्र वाणी नाहीं. अशी बहुधा समजूत आहे. ईश्वरास मुखादि अवयव नाहींत. तेव्हां तेथें बोलणें कसें संभवतें. तर त्याविषयीं असें समजावें कीं आकाशवाणी तेजोमय रूपादिकें इत्यादि द्वारा आपलें मनोगत जीवांस प्रगट करण्याविषयीं ईश्वर आपल्या अचिंत्य शक्तीनें समर्थ आहे. वेद ब्रह्मदेवानें सांख्यादि षड्दर्शनें कपिलादिकानें स्मृती मन्वादिकानें पुराणें व्यासानें केलीं. हीं ईश्वरानें केलीं तर ब्रह्मादिक व ऋषी यांचीं नांवें कां तर ते सर्व ईश्वराचे अवतार. त्यांस मनुष्य समजूं नयेत. त्यांचे बुद्धीस परमात्मा विशेषेंकरून स्फुरद्रूप होऊन ते बोलिले तस्मात् ती सर्व ईश्वराची वाणी असें सिद्ध होतें.

कोणी कोणी अशी शंका घेतात कीं पूर्वोक्त सर्व प्रकारची एकाचीच वाणी नाहीं. आणि एकच समयीं प्रकट झाली असेंही नाहीं. जे विद्वान् शाहाणे झाले असे जे प्राचीन काळींचे पुरुष होऊन गेले त्यांनीं त्यांनीं आपआपल्या समजुती-प्रमाणें मताप्रमाणें लिहून ठेविलें. ज्याचा कर्मकांडावर, भक्तींवर, ज्ञानावर, जातिभेदावर, राजकीय, लोकव्यवहारावर शिल्प, वैद्यक, ज्योतिष, व्याकरण इत्यादि विद्यांवर किंबहुना भूतप्रेतादि साधनरूप अभिचारांवर जसजसा भर त्याणें तसतसें लिहून त्यांजवर लोकांची भक्ति बसावी ह्मणून देवादिकांची अथवा प्रसिद्ध ऋषिजनांचीं त्या त्या ग्रंथीं नांवें घातलीं. ती सर्वसाधारण मनुष्यवाणी असें कोणास वाटूं नये ह्मणून आपआपलीं नांवें अथवा ठिकाणें अथवा वास्तविक काल हें कांहींच दर्शविलें नाहीं. ते सर्व ग्रंथ निरनिराळ्या कवींनीं केले ह्मणून एकच विषयावरील (कर्मकांड कां होईना) अनेक ग्रंथ पाहिले असतां अनेक मतें सांपडतात. विश्वाची उत्पत्ति, भूगोल खगोलादिकांचीं रूपें, धात्वादिकांची रचना, विष्णु, शिव, देवी इत्यादि पंचायतनरूप देवांचीं माहात्म्यें व कर्में तसेंच खाद्याखाद्य, विधिनिषेध, व्रतें तीर्थें किंबहुना भक्तियोग ज्ञान यांविषयीं पाहूं गेल्यास स्पष्ट एकवाक्यता आढळत नाहीं. एक ह्मणतो हा देव श्रेष्ठ. एक ह्मणतो तो श्रेष्ठ. एक ह्मणतो हें करावें एक ह्मणतो तें न करावें. इत्यादि प्रकार आहे.

जर सर्व ग्रंथ एकाच काळीं झाले आहेत तर प्राचीन अर्वाचीन् संस्कृत असा भेद कां? अवघे संस्कृत तर खरे परंतु संहिता सूक्त इत्यादि वेदभाग तसाच उपनिषद्भाग या उभय वाणींत भेद दिसतो. आणि व्याकरणाचे पद्धतीस जितके मन्वादिकांचे स्मृतिरूप लेख अनुसरून आहेत तितके वेदवाणींतील प्रयोग अनुसरून नाहींत, तस्मात् श्रुति शास्त्रें हीं मागाहून झालीं असें संभवतें. याच मानानें पाहातां पुराणादिकांपेक्षां अर्वाचीन् कालिदासादिकांची वाणी पूर्वोक्त पद्धतीस अगदीं जवळ असती. स्मृति झाल्यानंतर पुराणें, आणि त्यानंतर कालिदासादिक काव्यें, असें दिसून येतें. सारांश "श्रुतिश्च भिन्ना स्मृतिरेव भिन्ना नानाऋषीणां मतमेव भिन्नं" हें वाक्य सत्य होय.

पुराणादिकांत अगदीं अकटोविकट व सांप्रतकाळच्या अनुभवास विरुद्ध अशा गोष्टी लिहिल्या आहेत तसेंच दुराचरण व क्रूरस्वभावप्रवर्तक असे वृत्तांत सांगितले आहेत; तसेंच स्मृत्यादिकांत लोकव्यवहारास अपायकारक, सर्वत्र ममता व स्नेहभाव यांस विध्वंसक आणि पक्षपात व स्वार्थ-बुद्धि यांतें द्योतक अशी नीती व धर्म सांगितला आहे. जसें एकानें अवघा समुद्र प्राशन केला, एकास १० हजार मुलगे झाले, लोहपिष्ट खाऊन दाहा सहस्र वर्षें तप केलें. एक आपल्या कन्येच्या मागें धांवला, तसाच एक गुरुपत्नीशीं रत झाला, एक जरा उठला नाहीं हें एकानें पाहून माझा

अनादर झाला ह्मणून सर्वस्वें त्याचा नाश केला. सर्व मनुष्य-जाती केवळ समसमान असतां त्यांतील एकजण अति पातकी, इतरांचे सेवेस योग्य, एक अगदीं पवित्र, सर्ववंद्य, एकानें एकाचें सर्वस्व हरण केलें, त्यांत त्याचें कल्याण व नीचानें थोराचें किंचित् घेतलें असतां, त्यांत त्याचा अगदीं नाश, पुरुष केवळ स्वतंत्र, स्त्री केवळ परतंत्र, वृक्ष पाषाण पश्वादिकांची पूजा करावी, आणि मनुष्यांपैकीं कित्येकांची सावलीहि घेऊं नये असें मत ज्या ग्रंथीं प्रतिपादिलें आहे ते ग्रंथ वाचून काय फळ. त्याजवरून मनास काय बोध होईल? तेणेंकरून ईश्वराचे गुण ऐकिले वर्णिले असें कसें होईल. असा संशय प्राप्त झाला असतां त्याचें निराकरण करण्याचा उपायः—

आलोड्य सर्वशास्त्राणि विचार्य च पुनः पुनः ।
इदमेकं सुनिष्पन्नं ध्येयो नारायणः सदा ॥ १ ॥
अष्टादशपुराणानां व्यासस्य वचनद्वयं ।
परोपकारः पुण्याय पापाय परपीडनं ॥ २ ॥
वेद अनंत बोलिला अर्थ इतुकाचि साधिला
विठोबाला शरण जावें; निजनिष्ठे नाम घ्यावें ।
अठरा पुराणांचे पोटीं नाहीं नामावांचुनी गोष्टी ॥ ३ ॥

या वाक्यांवरून पाहतां वेदशास्त्र पुराणादिकांचें तात्पर्य असें दिसतें कीं अप्रवृत्ति ह्मणजे केवळ पापकर्म, प्रवृत्ति ह्मणजे लोकदृष्ट्या बाह्यात्कारें मात्र चांगलें. असे अप्रवृत्ति, व प्रवृत्ति धर्म सोडून निवृत्ति ह्मणजे केवळ ईश्वराराधनरूप धर्म

जीवानें आचरावा. तर मग निवृत्ती धर्मच कां सांगितला नाहीं. त्याज्य असे जे पूर्वोक्त धर्म ते कां सांगितले? त्याचें कारण असें कीं, त्या त्या कर्मांचीं स्वरूपें व फळें समजल्यावांचून ते धर्म सोडून निवृत्तिमार्गाकडेस प्रवृत्ति होणार नाहीं. ह्मणून त्या धर्माकडेस प्रवृत्ति व्हावी ह्मणून ते वर्णिले नाहींत. असें वेदादिकांचें तात्पर्य असतां मूर्खजन वेद, शास्त्रें पुराणें यांचा विपरीत अर्थ करितात. त्यांतील गुण न घेतां दोष घेऊं पाहतात.

यामिमां पुष्पितां वाचं प्रवदंति विपश्चितः ।
वेदवादरताः पार्थ नान्यदस्तीति वादिनः ॥ १ ॥

पुराणादिकांत जशी ज्या काळीं लोकांची स्थिति, समजूत, प्रसंग, चमत्कार, आढळले त्या त्याप्रमाणें कांहीं शंका न धरितां स्पष्टरीत्या वर्णन केलें आहे.

सत्यलेखांचें तरी असेंच स्वरूप असावें. परंतु एका ब्राह्मणानें समुद्र प्राशन केला, इत्यादि असंभवित गोष्टींत सत्य कोठें राहिलें असें ह्मणू नये. कधींच जी गोष्ट झाली नाहीं त्याची लोकांत कधींच प्रवृत्ति होणार नाहीं. तर मग खपुष्पाची कशी प्रवृत्ति झाली. केवळ खोटी गोष्ट असतां अंधपरंपरेनेंही प्रवृत्ति होते. जशी कन्या उत्पन्न होतांच तिला मारून टाकायाची चाल राजस्थानाकडेस होती. खपुष्पाची काय प्रवृत्ति झाली आहे? तें कोणीं कधीं तोडून आणून देवास पुजिलें असें कोठेंच आढळत नाहीं. त्याच्या

ठायीं अस्तित्व नाहीं. हें त्याच्या स्वरूपावरूनच समजतें. अंधपरंपरेनें चालत आलेल्या गोष्टींचा विचार झाला नाहीं तोंपर्यंत एकदेशी प्रसिद्धि असती. विचारांतीं लौकरच खोटेपणा दिसून येतो. झालेले गोष्टीची लोकांत प्रवृत्ति होणें ह्मणजे तेथील सर्व लोकांनीं मान्य करणें. त्याविषयीं कांहीं लेख असणें त्याचा अमुक काल देश असणें, त्याचे स्मरणार्थ अथवा तदुद्देशें कांहीं कर्म घडणें इत्यादि प्रकार आहेत. याचप्रमाणें पुराणादिकांतील अवतार, पराक्रमी, साधु, ज्ञानी पुरुष इत्यादि वर्णिले आहेत त्यांविषयीं लोकांत प्रवृत्ति आहे. अवतारादि तसेंच पुण्यशील राजे शापादपि शरादपि ऋषी झालेच नाहींत. नाटकादि ग्रंथीं जशीं कल्पित पात्रें, त्यांचा रमणीय व्यवहार कर्में कल्पितात, तशाच कविजनांनीं कल्पित कादंबरी करून ग्रंथाचा विस्तार पुराणादिरूपें केला आहे हें बोलणें संभवत नाहीं व कोणताही देश ह्मटला ह्मणजे त्याचे पूर्वज, त्याची पूर्व बरी वाईट स्थिति असते. कारण पूर्वजादि अथवा पूर्वस्थिति वाचून एकदम एखादा देश उत्पन्न होईल असें संभवत नाहीं. आतां या हिंदुदेशा-सारिखा विस्तीर्ण व उत्तमावस्थेप्रत पावलेला व केवळ पुरातन काळापासून असणारा यांत पूर्वीं कांहींच वर्णनीय झालें नाहीं. जें लेखांत आढळतें ती केवळ विद्वान् लोकांची कल्पना हें सयुक्तिक बोलणें नाहीं. जे जे अवतारादिक झाले त्यांचीं स्थळें तसेंच काश्यादिक्षेत्रें, गंगादि नद्या, पुराणांत

वर्णिल्याप्रमाणें आढळतात. त्या त्यांचे वंश गोत्रादि उच्चारणारे उपासना करणारे व त्यांच्या त्यांच्या उद्देशें रामजयंति कृष्णजयंति व तसेच उत्साहादि इतर प्रकार देवालयें यात्रादि करणारे सांपडतात. तेव्हां पुराणांतील कथा पंचोपाख्यानांतील अथवा नाटकांतील गोष्टींसारख्या कशा होतील, याविषयीं कोणी पूर्वोक्त आचरितें आचरतात काय? ब्राह्मणानें समुद्र प्राशन केला अशा वर्णनावरून पुराणांतील सर्वच गोष्टी असंभवित होत नाहींत. जर तें अकटोविकट वर्णन असें वाटेल तर ती अतिशयोक्ति अशी कल्पना करावी.''

## लेख ॥३॥ ईश्वरमाहात्म्य.

''भगवंताचें माहात्म्य कोणासहि पुरतेपणीं कळत नाहीं. तो कसा कोण आहे हें कोण सांगूं शकेल? त्यानें जें हें विश्व निर्माण केलें आहे त्यांतील एखादा पदार्थ वृक्ष पशु इत्यादि याचेंहि पुरतेपणीं ज्ञान होत नाहीं. मग त्या ईश्वराचें ज्ञान कसें होईल? ईश्वर सर्वव्यापक निराकार निर्गुण असतां सगुण अवतारादिक कसे धरितो, आपल्याच ठायीं सृष्ट्यादिक कार्यें जीव देव इत्यादिक उत्पन्न करून आपण त्यांजपासून वेगळा कसा राहतो हें त्याचें त्यास कळे. हें ब्रह्मादिकांस देखील कळत नाहीं. ''यस्यांतं न विदुः सुरासुरगणा देवाय तस्मै नमः'' ह्मणून वाक्य आहे, व व्यास साक्षात् नारायणस्वरूप तेहि ह्मणतात कीं ''तेने ब्रह्म हृदा य आदिकवये मुह्यंति यत् सूरयः'' व ''अनुक्रमिष्यन् स तु

बालबुद्धिः" असा नारायण सच्चिदानंद ईश्वर आहे. परंतु नारायणस्वरूप जीवाचें स्वरूप कळल्याविना जीवास मुक्ति नाहीं. तें स्वरूप वेदांतादिक शास्त्रें गुरु आत्मप्रतीति इत्यादिकांवरून कळतें. याप्रमाणें नारायणस्वरूप जाणून बहुतजण कृतकृत्य झाले असें आढळतें. तेव्हां कसें, त्यास, त्या जीवांस त्यांचा उद्धार ह्मणजे त्यांचें कार्य व्हावयापुरतें मात्र ईश्वराचें व त्यांचें स्वरूप कळलें. अनंत जो भगवान् त्याचा अंत कोणीं जाणावा, व त्या सर्वोत्तम अनंताचें सर्वस्वच कळलें पाहिजे असें नाहीं. त्याचें यत्किंचित् वास्तविक ज्ञान झालें असतां जीवाचें कार्य होतें, व सांप्रत अल्पबुद्धि जीव त्याचें अनंतत्त्व कसें जाणूं शकतील. व सकळ विश्वरचना व त्याचें अतर्क्य स्वरूप हीं जीवांनीं जाणावीं अशी जर त्याची इच्छा असती तर साक्षात् परब्रह्मस्वरूप कृष्णनाथ अवतरले होते, तेव्हां अर्जुनादिकांस कां सांगितलें नाहीं? त्याचें कार्य व्हावयापुरतें मात्र त्यास सांगितलें.

वेदशास्त्र, सद्गुरु, आत्मप्रतीति इत्यादिकांपासून जें ज्ञान प्राप्त होतें तें असें.

ईश्वर सच्चिदानंद सर्वव्यापक सर्वशक्ति अनंत अपार निर्गुण निराकार आहे.

त्यास भक्तांची प्रीति फार. त्यांच्या करितां तो सगुण रूपें धारण करितो. तोच सर्व सृष्टि नटला आहे. परंतु त्याच्या ठायीं माया व तत्कार्य हें कांहींएक नाहीं.

जीव त्याचाच अंश आहे. तो जोंपर्यंत अज्ञानावृत्त असतो आणि मायेचा स्वीकार करितो तोंपर्यंत त्यास त्या परमात्म्याची प्राप्ति होत नाहीं. जेव्हां त्यास सद्गुरुप्रसादें-करून परमात्म्याचें ज्ञान होतें त्या काळीं त्याचें अज्ञान नष्ट होऊन त्यास परमात्म्याची प्राप्ति होते. तो केवळ आनंदांत असतो. त्यास मग कांहीं धोका नाहीं. त्याचें येणें जाणें खुंटलें. मग त्यांनीं सद्गुरुउपासना ईश्वरभजन केलें असतां त्यांस अधिकाधिक सुख होतें.

वरकड जे जीव ईश्वरास विन्मुख त्यांस दुःखें यमादि-कांच्या जाचण्या. जे शुद्ध भावानें त्यास शरण आहेत व सद्गुरुकृपेनें आत्मज्ञान पावले नाहींत त्यांजवरहि ईश्वर कृपा करितो. ह्मणून जो प्राणी जन्मास आला त्याणें नारायणास सर्वभावें शरण असावें त्याजवर नारायण कृपा करील."

वरील वेंचांवरून हरि केशवजी यांचीं धर्मसंबंधीं मतें कायमचीं होऊन गेलीं होतीं असें दिसून येईल. त्याप्रमाणें त्यांचे निधनकालापर्यंत ते नित्य ईश्वरभजन, पूजन, गीता-भागवतादिकांचें पठन करीत असत. प्रत्यहीं ते ज्ञानेश्वरीचा पाठ करीत असत.

सन १८५८ सालांत ज्येष्ठ मासांत त्यांस अतिसाराचा उपद्रव होऊन रविवार आषाढ शु० १ तारिख ११ जुलै १८५८ रोजीं त्यांनीं देह ठेविला.

---



# भाग सहावा.



## त्यांविषयीं शिष्टाभिप्राय.

### Certificate from Captain Jervis.

The bearer Huree Kesav has served in the Engineers' Institution as storekeeper for nearly three years. He is well-versed both in his native language Marathi and in English and therefore valuable as a translator. He has only one defect, that is slowness, but his honesty and good behaviour make ample amends for it.

Bombay 4th January 1829.

(Sd.) GEO. JERVIS,<br>
Captain of Engineers<br>
Supt. Eng. Institution.

*An extract of a Letter from Lord Clare, Governor of Bombay, addressed to the Hon'ble Mr. James Farish.*

21st August 1832.

My dear Sir,

I have had the pleasure to receive your letter with the Marathi Translation of the Conversations on Natural Philosophy, and I beg you will assure the Translator that it will give me great pleasure to have the work dedicated to me. Of its merits, not under-

standing a word of the language, of course I cannot pretend to speak, but I think the work is a proof of success. This commencement of the work to instruct the natives at this station shows that progress has been made amongst them. Will you have the goodness to inform Hurry Keshawji that I have read his letter with feelings of great satisfaction and that I beg to assure him that his progress is much more than a slight degree of knowledge of English language as he very modestly states...... His letter shows that he has made great progress.

A True extract
( Sd. ) J. FARISH.

*Certificate from Mr. A. Bell, Sessions Judge.*

This is to certify that Hurry Keshowjee has been employed in the Court of Adawlut at Thana as second clerk and Translator for the period nearly of four years, which situation he held with great credit to himself and to my perfect satisfaction. In consequence of his family and relations residing in Bombay and an offer of a situation in the Suder Diwanee Adawlut having been made to him, he was induced to relinqiush his present employment ( the salary of which was 100 Rupees ) and accept one of less emolument at Bombay in order to be near his family. He is most intelligent and highly respectable person and in my opinion capable of holding the highest situation under the Government.

( Sd. ) A. BELL,

Conkan Court of Adawlut, 27th October 1832. — Judge and Sessions Judge.

*Certificate from Mr. H. Young, Judge, Bombay Suddar Adawlut* ( an extract from the record of the Suddar Adawlut. )

The Translator Hurri Keshowjee since he joined the court has given equal satisfaction and needs no further recommendation on account of his general intelligence, information and ability. He is employed in translating a scientific work from the English into Marathi and deserves well of all classes for his praiseworthy undertaking which I hope to see published on my return.

11th December 1833. ( Sd.) H. YOUNG, JUDGE,
Bombay Suddar Adawlut.

*Certificate from Mr. Ewart H. Baille.*

This is to certify that Hurri Kesav, Translator in the Sudder Adawlut, is an highly respectable and talented person and deserving of encouragement and promotion which I hope he will get.

His literary attainments are of a very superior order, [ Some words here are eaten away by white ants. ] soundness of judgment and the correct application of his talents.

I have much pleasure in giving him this testimony of my opinion of him.

( Sd.) EWART H. BAILLE.
4th January 1837.

*Certificate from the Honorable Mr. James Farish.*

I have known Huree Keshowjee for upwards of twenty years, and have had much intercourse with him in this period, particularly during his preparation of the translations of various works which he has rendered into Marathi. I have much pleasure in giving this writing to him owing to my great esteem for him.........that his endeavours for the benefit of his country-men may secure him some advancement. His talents, acquirements and inoffensive habits and assiduous attention to whatever duty he undertakes may enable him still further to promote the objects to which he has been so much devoted.

March 1841. (Sd.) J. FARISH.

*Certificate from Mr. D H. Heminix. Registrar Suddar Adawlut.*

Hurree Keshowjee Translator of the Suddar Adawlut has requested a certificate of his conduct on the occasion of his obtaining leave for an year in order that he may officiate in a similar capacity in the Supreme Court. I have much pleasure in adding my testimony to that of the many gentlemen who have certified their acquaintance with the excellent character and high qualifications of Huree Keshowji who during the 14 years that he has served in the Suddar Adawlut has fully maintained the good reputation with which he entered this office.

The Suddar Adawlut, (Sd.) D. H. HEMINIX,
22nd January 1847. Registrar Suddar Adawlut.

*Certificate from Mr. M. Simson, P. Judge S. A.*

Huree Kesao, Translator in the Suddar Adwlut, having requested from me a certificate of his qualification I have much pleasure in stating that whenever I have had occasion to refer to him he has always given me great satisfaction. His knowledge of the English language is extensive and generally correct, his character is I believe irreproachable and I altogether consider him a very valuable servant and deserving of giving encouragement and promotion.

Bombay, 11th March 1845. (Sd.) M. SIMSON,

P. Judge Suddar Adawlut.